साप्ताहिक

# माणूस

४ मे १९८५/दोन रुपये

रंगपूरचे वनवासी

## डोळस न्यायाकडे







## फुटपाथ कोणासाठी?

साप्ताहिक

# माणूस

¤

वर्ष : चोविसावे
अंक : एकूणपन्नासावा

¤

४ मे १९८५
किंमत : दोन रुपये

¤

संपादक
श्री. ग. माजगावकर

¤

साहाय्यक
दिलीप माजगावकर
सौ. निर्मला पुरंदरे
मेघा राजहंस

¤

वार्षिक वर्गणी
साठ रुपये

¤



¤

राजहंस प्रकाशन संस्थेच्या मालकीचे हे साप्ताहिक संस्थेतर्फे मुद्रक व प्रकाशक श्री. ग. माजगावकर यांनी साप्ताहिक मुद्रण, १०२५ सदाशिव, पुणे येथे छापून तेथेच संस्थेच्या कार्यालयात प्रसिद्ध केले.

¤

: पत्ता :
साप्ताहिक माणूस
१०२५ सदाशिव, पुणे ४११०३०
दूरध्वनी : ४४३४५९

¤

मुखपृष्ठ
सुरेश नावडकर

# गुजराथ समाचार

गुजराथेतील चालू दंगलीत ज्या 'गुजराथ समाचार' या दैनिकाचे अहमदाबाद येथील कार्यालय जाळले गेले त्या दैनिकातच एकेकाळी मुख्यमंत्री माधवसिंग सोळंकी हे उपसंपादक म्हणून कामाला होते. या दैनिकाचे सध्याचे कार्यकारी संपादक श्रीयांस शांतिलाल शहा आणि सोळंकी यांची पुढे बऱ्याच काळपर्यंत चांगली गट्टीही होती. पण श्रीयांस शांतिलाल शहा यांच्या पत्नींना एका सार्वजनिक संस्थेचे पद अपेक्षेप्रमाणे मिळाले नाही म्हणून या दोघात दुरावा निर्माण झाला असे म्हणतात व हे दैनिक सोळंकी यांच्या नंतर विरोधात गेले. योगेंद्र मक्वाना या राजकीय प्रतिस्पर्ध्यावर मात करण्यासाठी याच दैनिकाने पूर्वी सोळंकी यांना साथही दिली होती. खरे म्हणजे राखीव जागा विरोधी आंदोलन मध्यतरी शमले होते. सोळंकी सरकारने राखीव जागात निवडणुकीच्या पूर्वी घोषित केलेली वाढ तातपुरती स्थगित केली होती व विद्यार्थी नेत्याचीही तुरुगातून मुक्तता केली होती पण 'गुजराथ समाचार' व इतर काही वृत्तपत्रांनी दंगलीच्या, पोलिसी अत्याचारांच्या भडक व एकतर्फी वार्ता छापून, चित्रे प्रसिद्ध करून पुन्हा वातावरण तापवले. मालकांच्या सांगण्यावरून किंवा स्वत:च्या बुद्धीने पत्रकारानीही या विपर्यस्त पत्रकारितेला काही प्रमाणात खतपाणी घातले याची प्रतिक्रिया तीव्र उसळली व 'गुजराथ समाचार' जाळले गेले. पत्रकारानाही मारझोड झाली. अ. भा. संपादक परिषदेने पुढे येऊन या पक्षपाती वृत्तपत्रकारितेचा निषेध केला आहे, व दैनिकाचे कार्यालय जाळणे, पत्रकारांना मारणे हे निंद्य व असमर्थनीय कृत्य असले तरी वृत्तपत्रांनीही काही आचारसंहिता पाळली पाहिजे असे म्हटले आहे गांधीजीच्या गुजराथमध्ये हे घडावे याचा तर अनेकांना धक्का बसला आहे. स्वातंत्र्याबरोबरच जबाबदारी येते, हे, परकीय सत्तेविरुद्ध कायदेभंग चळवळ सुरू करतानाही गांधीजीनी आग्रहपूर्वक सांगितले. वृत्तपत्रांना स्वातंत्र्य हवे आणि सत्याचे बंधन नको असे कसे चालणार ? लोकशाही हवी असेल तर प्रत्येकालाच स्वातंत्र्याबरोबर जबाबदारीही उचलावी लागेल. स्वमताचा प्रचार वेगळा आणि 'गुजराथ समाचार'ने केली तशी एकतर्फी, विपर्यस्त पत्रकारिता वेगळी. अ. भा. संपादक परिषदेने फक्त 'गुजराथ समाचार'वरच ठपका ठेवला आहे असे नाही. इतरही स्थानिक वृत्तपत्रांना याबाबतीत दोषी धरले आहे. गुजराथ समाचारवर सोळंकी सरकारचा विशेष रोष होता, त्यामुळे हानी गुजराथ समाचारची अधिक झाली. प्रत्यक्ष पोलीसच या जाळपोळीत पुढाकार घेत होते. इतरांची हानी कमी झाली असली तरी सर्वांनीच आत्मपरीक्षण करावे असा हा प्रसंग आहे. वृत्तपत्रांच्या बाजूने लोकांनी उभे रहावे, पत्रकारांना लोकाची सहानुभूती लाभावी असे वाटत असेल, तर या घटकानेही स्वातंत्र्य आणि सत्य या मूल्याना जपले पाहिजे. नाही तर

अशा दुर्दैवी व धक्कादायक प्रसंगाची पुनरावृत्ती इतरत्रही होऊ शकेल.

वृत्तपत्रे आणि शासनसत्ता याचे संबंध कसे असावेत हाही यानिमित्त पुढे येणारा एक विषय आहे. ते विरोधी नसावेत तसेच अंकित स्वरूपाचेही असू नयेत. 'प्रतियोगी सहकारिता' हे या बाबतीतले टिळकसूत्र आहे व ते पारतंत्र्यकाळात जेवढे लागू होते तेवढेच आजही लागू पडते. सरकारची जी धोरणे जनहिताची असतील त्या धोरणाना पाठिंबा देण्यात वृत्तपत्र स्वातंत्र्याचा संकोच होतो, असे मानण्याचे कारण नाही. वृत्तपत्रांनीही विरोधी राजकीय पक्षांची भूमिका बजावण्याची आवश्यकता नाही. अंकित वृत्तपत्रे ही खरी म्हणजे वृत्तपत्रेच नव्हेत. मग हे अंकितपण एखाद्या राजकीय पक्षाचे असो, एखाद्या नेत्याचे असो की, सरकारचे–कारखानदाराचे असो. जर वृत्तपत्रे हा लोकशाहीचा स्वतंत्र आधारस्तंभ असेल तर त्याने आपले अस्तित्व स्वतंत्र ठेवण्याचाही जाणीवपूर्वक, जागरूक राहून प्रयत्न करायला हवा. असा प्रयत्न अवघड असतो म्हणूनच वृत्तपत्राकडे समाज वेगळ्या भावनेने पाहतो, काही मार्गदर्शनाची वृत्तपत्रांकडून अपेक्षा बाळगतो तो धदा असला तरी इतर धंदेवाईकाकडे जसे पाहिले जाते तसे वृत्तपत्रांकडे पाहिले जात नाही. हा जनतेचा विश्वास, आदरभाव टिकायचा तर वृत्तपत्रानीही प्रतियोगी सहकारितेची टिळक–शिकवण दृष्टिआड करून चालणार नाही. गुजराथ समाचारचे आणि सोळंकी सरकारचे सबध या दृष्टीने कसे होते ? काही काळ नको तितके घनिष्ट आणि बिनसल्यावर नको तितके विरोधी संबंध हे काही स्वायत्त व जनहितवादी वृत्तपत्रसृष्टीचे खासच लक्षण नाही. आपली वृत्तपत्रसृष्टी अशी नव्हती म्हणून तर इंदिरा गांधींनी आणीबाणी पुकारल्यावर बहुतेकांनी माना टाकल्या. पुन्हा आणीबाणी या नाही त्या स्वरूपात येणारच नाही असे थोडेच आहे ? कारण राज्यकर्ते तेच आहेत आणि आपली समाजस्थितीही गेल्या दहा वर्षांत फारशी बदललेली नाही. पंजाबमध्ये वृत्तपत्रांवर बंधने लादली गेलीच ! समजा अशी स्थिती दुर्दैवाने पुन्हा सार्वत्रिक झाली तर गुजराथ समाचारसारखी वृत्तपत्रसृष्टी तिला कसे काय तोंड देऊ शकणार आहे ?

– श्री. ग. मा.

## रामायणाचे योगदान : एक स्पर्धा

आज भारतीय समाजात मोठी घुसळण चालू आहे. अशा काळात पारंपारिक संस्था व मूल्ये याचे काय स्थान आहे आणि 'आधुनिक' मूल्ये कोणती स्वीकारावी याचा विचार होणे महत्त्वाचे आहे. यासदर्भात 'रामायण' हे महाकाव्य चर्चेसाठी घेतले आहे व त्याबाबत काही प्रश्न पुढे दिले आहेत. आपण प्रत्येक प्रश्नाचे उत्तर थोडक्यात द्यावे. आपले विचार व मांडणी, यातील सखनता नेटकेपणा आणि सर्जनता यानुसार उत्तराचे मूल्यमापन केले जाईल आपल्या उत्तरांबरोबर आपले नाव, पत्ता, वय व व्यवसाय ही माहिती कृपया पाठवावी. पहिल्या तीन क्रमांकाना अनुक्रमे रु १५०, रु. १०० व रु. ५० रकमेची पारितोषिके देण्यात येतील. आपली उत्तरे दि. १५ जून १९८५ पर्यंत खालील पत्त्यावर पाठवावी. स्पर्धेचा निकाल १ ऑगस्ट १९८५ ला कळविण्यात येईल. स्पर्धेच्या निर्णयाबाबतचे परीक्षकाचे मत अतिम राहील

पत्रव्यवहाराचा पत्ता : ब्रह्मे ग्रंथालय, १२९ ब । २ एरडवणे पुणे ४११ ००४.

प्रश्नावली

(अ)

१) तुम्ही सपूर्ण रामायण वाचले आहे ? केव्हा ?

२) वाचले नसल्यास गोष्टीरूपाने ऐकले आहे का ?

३) रामायणाची कथा भावते ? का ?

४) रामायणाची कथा प्रत्यक्षात घडली असे वाटते ?

५) रामायणातील तुमच्या आवडत्या व्यक्तिरेखा कोणत्या ? का ?

६) रामायणातील कोणती घटना तुमच्या दृष्टीने सर्वात महत्त्वाची आहे ?

७) रामायणातील कोणती घटना तुम्हास सर्वात अधिक अस्वस्थ करते ? का ?

८) रामायण कोणती नैतिक शिकवण देते ?

९) रामायण व महाभारत यातील कथा आणि व्यक्तिरेखा याची तुलना करावी.

१०) आधुनिक जीवनात रामायण प्रस्तुत आहे असे वाटते ? का ?

११) रामायणातील एखादी व्यक्तिरेखा आपल्या जीवनाचा आदर्श म्हणून समोर ठेवली आहे ? कोणती व का ?

१२) तुमची रामराज्याची कल्पना काय आहे ?

(आ)

१३) तुमच्या दैनंदिन जीवनात तुम्हाला कोणते मूल्य सर्वात महत्त्वाचे वाटते ? का ?

१४) आदर्श स्त्री व आदर्श पुरुष तुम्ही कोणाला म्हणाल ?

१५) तुम्हाला लोकशाही की राजेशाही अधिक योग्य वाटते ?

१६) राज्यकर्त्यामध्ये कोणते गुण असावे असे तुम्हास वाटते ? तुम्हास खास आदरणीय वाटणाऱ्या राज्यकर्त्याचे नाव सागावे.

१७) पारपारिक मूल्याना आधुनिक जीवनात महत्त्व आहे का ? कोणत्या मूल्यांना ?

१८) आदर्श समाजाची आदर्श राज्याची तुमची कल्पना काय आहे ?

१९) तुमच्या मूल्यव्यवस्थेत सौंदर्यविचारास स्थान आहे का ?

२०) तुमचा देवावर विश्वास आहे का ? असल्यास देवासंबंधीची तुमची कल्पना व त्यावरील विश्वासाचे स्वरूप स्पष्ट करा

२१) आधुनिक भारतीय समाज पारंपारिक हिंदू मूल्यानुसार चालावा असे वाटते का ? कशा पद्धतीने ?

२२) तुमच्या मते हिंदुत्वाचे आधुनिक काळातील सर्वात उत्तम प्रतिनिधित्व कोण करते ?

ह्या ना त्या निमित्ताने । फिरोझ रानडे

# डॉ. आंबेडकरांच्या नावाने....

'हे मात्र तुमच्या सरकारनं फार छान केलं बरं का!' श्यामने वर्तमानपत्र वाचत वाचत मोठ्या समाधानाने सरकारचे कौतुक केले.

त्याचे ते मोठ्या समाधानी वृत्तीने केलेले कौतुक ऐकून राधाला थोडा अचंबा व खूप आश्चर्य वाटले.

'अरे वा! आज मोठी खुशीत दिसते आहे स्वारी. कधी नव्हे ते आमच्या सरकारचे कौतुक चालले आहे नाही पेक्षा नेहमी काही तरी खुसपटे काढून आमच्या सरकारला नावेच ठेवली जातात तुमच्याकडून. स्वभावच आहे तुमचा तसला.'

'आता त्याला काय करणार? मेव्हणे आता पुण्याला स्थाईक झाले आहेत आणि जावईसुद्धा सगळी दुसरी गावं सोडून नेमका पुण्याचाच मिळाला आहे तेव्हा त्याचा गुण नाही तरी थोडा वाण लागणारच!'

पुण्याच्या लोकांना टोचण्याची संधी श्याम अशी थोडीच दवडणार होता! आणि हिच जर नेहमीची वेळ असती तर राधाने आपल्या भावाच्या व जावयाच्या 'गुण नाही पण वाण' टिकेबाबत श्यामला चांगले फैलावर घेतले असते. तिचे भाऊ पुण्याला स्थाईक झाले होते हे पूर्ण सत्य होते. जावईपण पुण्याचा होता हे पण पूर्ण सत्य होते. पूर्ण सत्य अशा आवर्जून उल्लेख अशा करता की सध्या अर्ध-सत्याची फार चलती आहे म्हणून.

पण श्यामच्या खडूसपणाचे कारण त्याचा पुण्याशी जो नाते-संबंध होता तो नसून तो त्याच्या जन्मजात जातीचा गुण होता असे राधाचे स्पष्ट मत होते.

आज कधी नव्हे ते श्याम कौतुक मुडात आहे तेव्हा त्याचा तो मूड सांभाळणे हे आपले कर्तव्य आहे असे राधाला वाटले व म्हणून तिने आपले मत स्पष्ट असूनसुद्धा बाजूला ठेवले.

'ते पुण्याच्या लोकाचे राहू द्या हो! खडू उगाळावा तेवढा पांढराच!' राधाही वस्ताद होती. पुण्याच्या लोकाना उगाळण्याच्या म्हणीत सुद्धा कोळसा मानायला तयार नव्हती. 'तुमच्यासारख्यांनी सुद्धा कौतुक करावं अशी आमच्या सरकारच्या हातून गोष्ट तरी कोणती घडली?'

श्यामने राधाला आपल्या हातातले वर्तमानपत्र न देता समाधानदायक बातमीचा थोडक्यात साराश सांगितला.

महाराष्ट्र सरकारने डॉ. आंबेडकर वाचनालय पुरस्कार योजना आखली होती. सगळ्यात चांगल्या व उत्तम वाचनालयाला दरवर्षी सरकारकडून काही बक्षीस मिळणार होते. त्याप्रमाणे ह्या वर्षीचे निकाल जाहीर झाले होते. त्या बक्षीस वितरणाचा खास कार्यक्रम मंत्री-महोदयाचे हस्ते साजरा झाला होता.

ही होती मुख्य कौतुकाची बाब. किरकोळ कौतुकाची बाब म्हणजे मंत्री-महोदयानी आत्तापर्यंत सरकारचे वाचनालयाकडे दुर्लक्ष झाले अशी कबुली दिली होती व त्या सभेतच शिक्षण-मंत्रिवांना काही तातडीचे हुकूमपण दिले होते.

'खरंच, वाचनालयाच्या बाबतीत जी बक्षिसं डॉ आंबेडकराच्या नावाने ठेवण्याइतकी योग्य गोष्ट दुसरी कोणतीही नसेल.'

'का बरं?' राधाने अजाणता प्रश्न विचारला 'अग, का म्हणून काय विचारतेस? खरा व्यासंगी आणि अभ्यासू माणूस. बाकी सगळे लोक आपलो घर बांधतात ती आपल्या स्वतःला, बायका-मुलांना आरामात रहायला मिळावं म्हणून; पण डॉक्टरानी आपले घर बांधले ते आपली हजारो पुस्तकं चांगली व व्यवस्थितपणे ठेवता यावीत म्हणून.'

श्याम स्वतः कधी कोठल्याही कॉलेजात म्हणून गेला नव्हता. त्याचे काही मित्र दादरच्या रुइया कॉलेजात शिकत असत. त्यांच्या कॉलेजात उनाडक्या करायला म्हणून श्याम त्या कॉलेजात बऱ्याच वेळा जात असे.

डॉ. आंबेडकराचे 'राजगृह' हिंदु कॉलनीतल्या त्या रुइया कॉलेजच्या रस्त्यावरच होते. त्या वेळी जाता-येता श्यामने 'राजगृहा'विषयी ही माहिती गोळा केली होती.

असंच एकदा रुइया कॉलेजला जाताना त्याने डॉक्टराना पाहिलं पण होतं. त्या वेळी ते बरेच आजारी असावेत. कारण त्याना दोघा-तिघा इसमानी बखोटयाला धरून गाडीत बसवल्याचे त्याला आठवत होते. पांढराशुभ्र झब्बा, पांढरी धोतराची लुंगी व थोडा स्थूल देह! हे दृष्य अजूनीही डॉक्टराचा काही विषय निघाला की श्यामच्या डोळ्यांसमोर येते.

श्यामने बातमी तर सांगितलीच वर आपली मल्लीनाथी पण केली. राधाला पण आंबेडकराबाबत बरीच माहिती मिळाली. थोडया वेळाने राधा आपल्या कामाला निघून गेली आणि श्याम आपल्याशी विचार करत बसला.

खरंच, आपण डॉ आंबेडकराची इतकी माहिती सांगितली; पण खर बघितल तर ती किती जुजबी माहिती आहे नाही?

त्याचे चांगले असे चरित्र कोणी हिंदी वा विलायती लेखकानी लिहिले आहे का? तसे आपण धनंजय कीरानी लिहिलेले चरित्र वाचले आहे; पण ते फार प्राथमिक स्वरूपाचे वाटते. डॉ. आंबेडकराबाबतचे किती तरी प्रश्न त्याबाबत अनु-उत्तरीत राहिले आहेत.

आपल्या वाचनालयातून तरी त्याचे चांगले चरित्र वाचायला मिळेल ह्याचा भरवसा काय? सर्वसाधारणपणे आपल्या वाचनालयातून चरित्र-ग्रंथाची आबाळच होत असते.

काही दिवसापूर्वी श्यामला अशीच देवी अहिल्याबाईबद्दल काही वाचायची सुरसुरी आली. तेव्हा तो तातडीने जगप्रसिद्ध एशियाटिक लायब्ररीत गेला. तेथे अहिल्याबाईवर मोजून पाच पुस्तकं होती व त्यात मोजून मराठीतले एकही पुस्तकही नव्हते. दोन गुजराथी, एक इंग्रजी, एक कानडी, व एक तेलगू किंवा मल्याळी! बास, झाली अहिल्या-

बाईवरची पुस्तके.

त्यातल्या देशी भाषेतल्या पुस्तकाचा श्यामला काही उपयोग नव्हता. त्याला मराठीच्या अगदी जवळची अशी गुजराथी भाषासुद्धा येत नव्हती. मग तामिळ–तेलगू तर कित्येक योजने दूर होती अर्थातच इंग्रजी पुस्तक बाहेर गेले होते. तेव्हा जेवढा उत्साहाने श्याम वाचनालयात गेला होता तेवढाच उत्साहात तो परत आला

तेव्हा आंबेडकरावर काही पुस्तके असणे जरा अवघडच गोष्ट होती आणि समजा तशी देशभर पुस्तके असती तरी ती मुद्दाम घेऊन आत्मियतेने वाचणारे किती निघाले असते ?

काही तरी १॥–२ वर्षापूर्वीची गोष्ट. डॉ. आंबेडकरावरची दोन मराठी नाटके लागोपाठ रंगभूमीवर आली होती. श्यामने त्यातल्या त्यात निदान एकाला तरी जायचे पक्के केले व त्याप्रमाणे तो 'युग–पुरुष' नाटकाला गेला.

नाटक शिवाजी–मंदिरात होते. श्याम गेला त्यावेळी हॉल अगदी गच्च भरला होता मोठे उत्साहाचे वातावरण होते. आपल्या आवडत्या पुढाऱ्यावरचे नाटक पहायला मिळणार ह्या आनंदात सगळी प्रेक्षकमंडळी होती; पण ती सगळी नव-बुद्ध मंडळी होती. अगदी आपल्या बायका–मुलासकट आली होती

बुद्ध मंडळी होती; पण बुद्धिमान समजल्या जाणाऱ्या वर्गातले कोणी म्हणजे अगदी कोणीही नव्हते. अगदी नाही म्हणायला वा. य. गाडगीळ व एक–दोघे पत्रकार होते; पण ती मंडळी बहुधा त्या विषयावरील अधिकारी व्यक्ती म्हणून आमंत्रित केलेल्या असाव्यात असा श्यामचा होरा.

नाटकात ब्राह्मणाची दोन पात्रे होती. श्यामने त्यातल्या गोऱ्या व जाड्या 'ब्राह्मण' पात्राला मध्यंतरात गाठले. तर तो खराच ब्राह्मण निघाला. श्यामला त्याचाही थोडा आनंद झाला. जोशी त्याचे नाव.

'काहो, नाही म्हटल तरी ह्या नाटकात ब्राह्मणाविरुद्ध थोडं आहेच. तेव्हा तुम्ही हे काम करायचे स्वीकारले कसे ?'

'हे बघा,' जोशी बुवा म्हणाले, 'ह्या कामाबद्दल बाकीच्या नटाना जशी 'नाइट' मिळते तशी मलाही मिळते. म्हणून मी करतो. त्यात काय मोठं ?'

हे त्याचे वरवरचे उत्तर होते; पण श्याम काही वरवरच्या उत्तराने समाधान पावणारा माणूस नव्हता. मग बोलता बोलता जोशी बुवा म्हणाले, 'तसा मी विचारान भारतीय जनसंघवाला आहे...वगैरे...

ह्या उत्तरावरून श्यामला कळून चुकले की हा गृहस्थ फक्त 'नाइट' करता काम करत नाही आहे.

'चला, हेही नसे थोडके' श्याम मनाशी म्हणाला व परत प्रेक्षकात येऊन बसला.

त्यानंतर जो भेटेल त्याला 'काहो, आंबेडकरावरचे नाटक पाहिलत का' म्हणून विचारण्याचा श्यामला नादच लागला आणि आश्चर्य व परम दुःखाची गोष्ट अशी की, जवळजवळ कोणीही–पण जवळजवळ का ? अगदी कोणीही ती नाटके पाहिली नव्हती. पहाण्याची ओढ कुणाला वाटली नव्हती. नाटक पहाण्याचे राहून गेले ह्याबद्दल कोणालाही खत वाटत नव्हती.

ह्यात समाजवादी मंडळी होती, कम्युनिस्ट होते, स्त्री–मुक्ती आंदोलक होते, नाटक व साहित्य परिक्षण करणारे होते. त्यातल्या एकाही गृहस्थाने वा गृहिस्थिणीने हे नाटक पाहिले नव्हते.

काही सामाजिक जबाबदारी म्हणून तरी तुम्हाला आंबेडकरावरचे नाटक पहावेसे वाटले नाही ? श्याम आश्चर्याने विचारता,

'हो, खरं म्हणजे बघायला हवं होतं; पण काही ना काही कारणाने राहूनच गेले बघा.' हे ठराविक उत्तर ! पण ते राहून गेल्याबद्दल कोणालाही काही वाटले होते असे त्याच्या चेहऱ्या व मोहऱ्यावरून वाटत नव्हते

आणि त्याच वेळी एका उद्दाम दलित तरुणाशी एक ब्राह्मण कुळातली मुलगी लग्न करते व त्या मुलीची अगदी कुतरओढ होते. ह्या विषयावरचे नाटक फार गाजत होते व हे नाटक पहाणे आपले कर्तव्य आहे असे ही सगळी 'बांधिलकी' मानणारी माणसे मानत होती त्यावर चर्चा होत होत्या, रकानेच्या रकाने भरून टिका–टिपणी होत होत्या.

आता त्या 'कुतर ओढ' नाटकात डा. आंबेडकरांवरच्या नाटकापेक्षा जास्त नाट्यगुण असतील, सच चागला असेल पण ह्या थोर माणसावर आपण नाटक लिहावे असे कोणा लेखकालाच कधी वाटले नाही व जे काय नाटक रंगभूमीवर आले ते पहावे असे कोणा प्रेक्षकालाही वाटले नाही. हा फक्त योगायोग का त्यापेक्षा जास्त काही खोलवर वाटणाऱ्या भावना ?

आणि वाचनालयाना डॉ. आंबेडकराच्या नावाने दिलेली बक्षीस देण्याचा कार्यक्रम झाला व त्याच दिवशी श्यामने डॉ. आंबेडकराची व त्यांच्यावरची मिळतील ती पुस्तकें वाचून काढायचा निर्णय घेतला

आशियाटिक वा इतर लायब्ररीत काही मिळण्याचा संभवच नव्हता म्हणून तो गांधी स्मारक–संग्रहालयात गेला व डॉ. आंबेडकराचे एक व कोणा डॉ. लोखंडेचे एक अशी दोन पुस्तके घेतली.

पुस्तके घेत असताना लायब्ररीयन श्यामकडे काही वेगळ्या नजरेने पहात होता हे श्यामच्या लक्षात आले. पण कोणतेही पुस्तक घेतले तरी हे लायब्ररीयन लोक वेगळ्या नजरेने पहातात हा श्यामचा लहानपणापासूनचा अनुभव होता. फडक्यांच्या कादंबऱ्या घेतल्या तरी वेगळ्या तऱ्हेचे पहाणे व विनोबाचे गीता–प्रवचन घेतले तरी तसलेच पहाणे तेव्हा लायब्ररीयनच्या त्या वेगळ्या नजरेने पहाण्याकडे श्यामने लक्ष दिले नाही व तो तातडीने इमारतीच्या बाहेर पडला.

आणि काय आश्चर्य ! मुंबईसारख्या शहरात त्याला हवी होती ती बस येत असताना दिसली. श्यामने त्वरा केली व लगोलग बस पकडली. दुपारची वेळ होती त्यामुळे बस बरीच रिकामी होती.

श्याम एका रिकाम्या आसनावर जाऊन बसला. त्याच्या मांडीवर ती दोन पुस्तके होती. वरच्या पुस्तकावर मोठ्या अक्षरात DR. B. R AMBEDKAR UNTOUCHABLES ..वगैरे छापले होते शेजारच्या मध्यम वयीन मध्यम वर्गीयाने श्यामकडे चमकून पाहिले श्याम पण चमकला. त्याने वरचे पुस्तक खाली ठेवले व खालचे वर. तर त्यावर परत मोठ्या अक्षरात नाव होते : Bhimrao Ramji Ambedkar–a study in Social Democracy. परत शेजारच्या माणसाने श्यामकडे चमकून पाहिले व परत श्याम चमकला व ते दुसरे पुस्तक उपडे करून मांडीवर ठेवले.

थोड्या वेळाने प्रवास संपला. पण श्यामचे विचार चक्र चालूच राहिले. डॉ आंबेडकराचे पुस्तक पाहून तो माणूस चमकला का व त्यापेक्षा जास्त आपण का चमकलो ? आंबेडकराचे वा त्याच्या बद्दलचे पुस्तक वाचणे म्हणजे आपण कोण आहोत हे जाहीर करणे तर नव्हे ? म्हणून तो शेजार–प्रवासी चमकला व तो तसे समजला हे काही ठीक झाले नाही, असे वाटून आपण चमकलो ?

डॉ. आंबेडकरांची पुस्तके जोपर्यंत आपण अभिमानाने वाचत नाही तोपर्यंत त्यांच्या नावाने वाचनालयाला बक्षिसे देणे वगैरे सगळे फोल आहे हेच खरे. □

## सांस्कृतिक नागपूर

# ' सदाचा योद्धा '

ज्येष्ठ नागरिक मंडळाच्या वतीने दिनांक १८ एप्रिल रोजी तात्या टापे याच्या १२६ व्या पुण्यतिथीनिमित्त कै वसतराव वरखेडकर याच्या 'सदाचा योद्धा' ह्या काव्य सग्रहाचे प्रकाशन करण्यात आले. आझाद हिंद फौजेचे कर्नल गुरुबक्षसिह धिल्लाँ याच्या हस्ते ह्या पुस्तकाचे प्रकाशन झाले. तरुण भारतचे मुख्य सपादक श्री. दि. भा. घुमरे ह्या कार्यक्रमाच्या अध्यक्ष-स्थानी होते. समारभ मोठा हृद्य झाला. वसतराव वरखेडकर नागपूरच्या सास्कृतिक जीवनाला सपन्नता आणणारी व्यक्ती त्याचे नुकतेच निधन झाल्याने व त्याच्या निधनानतर एक महिन्याच्या आतच हा प्रकाशनाचा सोहळा झाल्याने उपस्थिताचे डोळे वारवार पाणावलेले दिसत होते.

ह्या निमित्ताने वरखेडकराच्या आठवणीनी मनात गर्दी केली. वसंतराव तसा जिद्दीचा माणूस. आणीबाणीच्या वेळी त्याचे सारे गुण उजळून आले. वरखेडकर त्यावेळी पत्रसूचना कार्यालयाचे प्रमुख. घमंवीर हे त्याच्याच खात्याचे केंद्रीय राज्यमंत्री. नागपूरच्या 'तरुण भारत'वर त्यावेळी मोठी वक्रदृष्टी होती. 'तरुण भारत रा स्व. संघाचे आहे अशी नोट तुम्ही तयार करा,' असा लकडा घमंवीरानी वरखेडकर याच्यामागे लावला. सरकारला त्यामुळे तरुण भारतच्या जाहिराती बद करून तरुण भारत बद करता आले असते. वरखेडकरावर जयप्रकाश नारायण ह्याच्या विचारांचा मोठा प्रभाव होता. तरुण भारतची हिंदुत्वनिष्ठ मते त्याना अजिबात पसत नव्हती. ते सरकारी नोकरीत होते तरीसुद्धा त्यानी घमंवीराना वजावले, 'वृत्तपत्र स्वातत्र्य ही एक फार मोठी गोष्ट आहे. मी कुठलेही वृत्तपत्र बद पडू देणार नाही किंवा कोणताही खोटा रिपोर्ट देणार नाही.' शेवटी घमंवीरांनी वरखेडकराना दीर्घ सुटीवर जाण्यास भाग पाडले परतु वरखेडकरांनी वृत्तपत्रीय स्वातंत्र्याला कुठेही धक्का लावला नाही

वाङ्मयीन क्षेत्रात वसंतरावानी अनेक प्रयोग केले. त्याना सुरुवातीपासून तात्या टोपे ह्या चरित्रनायकाने भारून टाकले होते. १९५७ मध्ये त्यानी 'सत्तावनचा सेनानी' ही एक ऐतिहासिक कादंबरी लिहिली. ती अतिशय लोकप्रिय झाली. महाराष्ट्रात 'स्वामी' पासून ऐतिहासिक कादबऱ्याच्या एका पर्वाला प्रारंभ झाला त्याचा मुळारभ वास्तविक वसंतरावानी केला. कालातराने त्यांनी कै. कृष्णाजी अनत नवलकर ह्या कलावताच्या जीवनावर 'राजपुत्र' नावाचे सामाजिक नाटक लिहिले तशाच प्रकारच्या विषयावर कुसुमाग्रजानी 'नटसम्राट' नावाचे नाटक लिहिले. ते विलक्षण प्रभावी ठरले वसतरावाचे नाटक मात्र मागे पडले. त्यानी 'प्रतिनिधी' नावाची एक कादंबरी लिहिली. राजकीय कादबरी लेखनाचा तो प्रारंभ समजला पाहिजे. अरुण साधूच्या 'सिंहासन' आदी कादबऱ्या त्यानंतर बाहेर आल्या. वसतरावांचा आणि फार मोठी कीर्ती यांचा योगच नसावा. अनेक वेळा त्याच्या बोलण्यातूनही तशी खंत व्यक्त होत असे; परतु तरीही शेवटपर्यंत वसतराव कधीही खचले नाहीत. ते ताठ मानेने जगले.

म्हणून 'सदाचा योद्धा' प्रकाशित होणे आवश्यक होते वसतरावानी त्याच्या प्रकाशनाकरिता जी तारीख निश्चित केली होती त्याच तारखेला ते प्रकाशित झाले. मध्ये वसतराव सर्वांमधून कायमचे निघून गेले; परतु नागपुरातल्या जिन्दादिल माणसांनी वसतरावाचे ते वचन कायम ठेवले. प्रकाशनाचाही सोहळा मोठा रगला. कारण कर्नल धिल्लाँ याची उपस्थिती. इतका तारुण्याने रसरसलेला म्हातारा आम्ही पाहिलाच नाही. देशभक्तीची गाणी म्हणताना ह्या म्हाताऱ्याच चेहरा जो चैतन्याने फुलून येतो त्याला जवाब नाही! गोष्टी सागता सागता आपणसुद्धा इम्फालच्या दाट जगलात शिरतो आणि हिंदुस्थानच्या सीमेच्या दिशेने कर्नल धिल्लाँ याच्या तुकडीबरोबर 'मार्च' करू लागतो! बरोबर आपल्या संगतीला असते कर्नल धिल्लाँ याचे 'कदम कदम बढाये जा' हे गीत!

'सदाचा योद्धा' श्री. वसंतराव वरखेडकर ह्याच्या स्मृतीला आमचा प्रणाम!

—शरश्चंद्र

# मुक्काम चंद्रपूर सिरोंचा

नक्षलवाद्यांना नेस्तनेबूत करण्याच्या उद्देशाने महाराष्ट्र शासनाने अलिकडेच एक घोषणा केली आहे. गडचिरोली जिल्ह्यातल्या सिरोचा भागातील तेंदु पान जमा करण्याच्या व विकण्याच्या व्यवसायाला सरकार पूर्णपणे हाती घेणार आहे, ही ती घोषणा. या कामासाठी सरकार हजारो राखीव पोलीस पाठवणार आहे. सरकारने उचललेल्या या नव्या पावलामुळे या घनदाट वनातील आदिवासी व इतर लोकाचा सघर्ष एका नव्या टप्प्यावर पोहोचला आहे.

जसजसा तेदु पानाचा हगाम जवळ येतो आहे, तसतशी या भागातील तणावाची तीव्रता वाढत चालली आहे या हगामात होणाऱ्या आदोलन व सघर्षांनी तीन तहसिलाना व्यापल आहे. सिरोचाला सुरू झालेल्या या सघर्षाचे लोण आहेरी व एटापल्ली तालुक्यातल्या गावामध्ये पसरलं आहे. उत्तरेकडे धानोऱ्यापर्यंत, पूर्वेला भामरागडच्या पलीकडे असलेल्या मध्य प्रदेशच्या बस्तरपर्यंत पसरलेल्या या आदोलनाचा प्रभाव बाहेरच्या माणसालाही सहज जाणवतो कम्युनिस्ट पार्टीच्या (मार्क्सवाद—लेनिनवादी) (पिपल्स—वॉर) कार्यकर्त्यांच्या प्रेरणेमुळे, या भागात बहुसख्येनं असलेले माडिया गोंड, 'आदिवासी किसान शेतमजूर सघटने'च्या छत्राखाली एकत्र आलेले आहेत. तेंदु पानं तोडण्याच्या मजुरीमध्ये वाढ करून देण्याची मागणी या सघटनेच्या नेतृत्वाखाली आदिवासींनी कंत्राटदाराकडे केली होती. यशस्वीरीत्या चालवलेल्या आदोलनामुळे १९८१ मध्ये पाच रुपये शेकडा असलेली मजुरी त्यानी १९८४ च्या हगामापर्यंत सतरा रुपयापर्यंत वाढवून घेतली. सघटनेने प्रस्तुत आकडेवारीनुसार १७ रुपये मजुरी

देऊनही ठेकेदारांना गेल्या हंगामात प्रत्येक युनिटमागे ६ लाख रुपयांचा नफा मिळाला. तर सरकारला संपूर्ण चंद्रपूर सर्कलमधून २० कोटी रुपयांचा ! एटापल्ली–भामरागड भागात बांबू कापण्याच्या दरात वाढीसाठी यशस्वी आंदोलन छेडले गेले आणि बल्लारपूर पेपर मिलला दर वाढवून द्यावा लागला. गावकरी आता शेतजमिनीच्या पट्ट्यांवर अधिकारांची मागणी करत आहेत. खेरीज इकडचा काही भाग भोपालपट्टनम् व इंचमपल्ली धरण प्रकल्पाखाली जाणार आहे म्हणून असंतोष आहेच. म्हणून या भागात क्रांतिकारी नेतृत्वाखाली उदयाला आलेल्या या व्यापक ट्रेड युनियन आंदोलनाला पाहून केंद्र व राज्य सरकारे चिंतेत पडली आहेत. गेली काही वर्ष आंध्र, मध्यप्रदेश, महाराष्ट्र व आता ओरिसा पोलिसांनी मिळून आपापल्या राज्यात नक्षलवादी चळवळीला व आंदोलनाला चिरडण्याची योजना बनवली आहे. केंद्रीय गृहमंत्री शंकरराव चव्हाण यांनी ही माहिती अलीकडेच लोकसभेच्या बैठकीत एका प्रश्नाचे उत्तर देताना दिली.

यावर्षी महाराष्ट्र शासनाने, नवविभागाच्या सिरोंचा, आलापल्ली व आहेरी या तीनही तालुक्यांच्या युनिटमधील ठेकेदारांना काढून टाकले आहे. पानं गोळा करण्याचं केंद्र सांभाळणे, मजुरांना मजुरी देणे आणि पानांचे गठ्ठे बिडी उत्पादकांना विकणे या सर्व कामांची जबाबदारी शासनाने आपल्याच खांद्यावर घेतलेली आहे. ३० ट्रक भरून आणखी विशेष राखीव पोलीस ( SRP ) आणले गेले आहेत. हंगामाचे काम 'सुरळीत' चालण्याच्या दृष्टीतून पोलिसांच्या बंदुकीच्या धाकात लोकांना काम करायला लावण्यात येणार आहे. (प्रत्येक केन्द्रावर पोलीस ठेवण्यात येणार आहेत) अशी जय्यत तयारी केल्यानंतर शासनाने घोषणा केलीय् की, ७० पानांच्या १०० गठ्ठ्यांसाठी सरकार फक्त १० रुपये मजुरी देणार आहे. लोकांना संघर्षाला चिथवण्यासाठी मजुरीत कपात करण्याचा हा डाव आहे. गडचिरोलीच्या जिल्हाधिकाऱ्यांनीच एका चर्चेत म्हटलंय की, 'हे वर्ष दुष्काळाचं असल्यामुळे लोकांना कमी मजुरीवर का होईना पण तेंदु पानं गोळा करण्याच्या कामासाठी यावंच लागणार आहे. कमी वेतनावर काम करणाऱ्यांना थांबवण्यासाठी नक्षलवादी जंगलाचा आश्रय सोडून गावात येतीलच, मग त्यांना पकडणे शक्य होईल.' थोडक्यात म्हणजे मजुरीतली कपात, राखीव पोलिसांची मोठी कुमक, या सर्व गोष्टी 'नक्षलवाद्यांच्या समाजाविरोधी कारवायांना आळा घाण्यासाठी' व त्यांच्या 'मिळकतीचा मार्ग बंद करण्याच्या' दृष्टीने कार्यान्वित केलेल्या योजनेचाच भाग आहेत. या योजनेसाठी राज्य सरकार एक कोटी रुपयांचा तोटा सहन करण्यासही तयार आहे. पोलिसांचा फक्त एक दिवसाचा खर्चच २ लाख रुपयांच्यावर होणार आहे.

पावसाळ्यानंतर पोलिसांकडून होणाऱ्या दडपशाहीचा या तीन तालुक्यातील लोकांना सतत सामना करावा लागला आहे. गेल्या वर्षी फेब्रुवारीत संघटनेने कमलापूर येथे अधिवेशन घेण्याचा प्रयत्न केला होता; परंतु ऐनवेळी सरकारने अधिवेशनावर बंदी आणली. चारशेच्यावर लोकांना अटक केली. तरी देखील सुमारे १०,००० लोकांनी कमलापूरपर्यंत पोहोचण्याचा प्रयत्न केला. जंगलातच छोटया सभा घेऊन ते परतले. डिसेंबर १९८४ मध्ये सर्वोच्च न्यायालयातील वकील व पिपल्स युनियन फॉर डेमोक्रेटिक राइट्स् (पी. यु. डी. आर्.) दिल्लीच्या कार्यकर्त्या नंदिता हक्सर यांच्या नेतृत्वाखालील लोकशाही हक्क संघटनांच्या एका समितीच्या पहाणीनुसार पोलिसांकडून लोकांना होणारी मारहाण, अटक, छळ व पैसेवसुलीसाठी जबरदस्ती यामुळे इकडचे प्रत्येक गाव टेकीस आलेले आहे. उदा. रेगुंटा गावातील लोकांनी (जे बहुतांशी दलित व आदिवासी आहेत) गावाच्या जमिनदारांविरुद्ध संघर्ष केल्यामुळे १० नोव्हेंबरला तेथील कार्यकर्त्यांना पकडून पोलिसांनी बेदम मारले. चंद्रम्मा व तिचे पति वेंकटय्याचे बैलसुद्धा जप्त केले. पुन्हा २५ नोव्हेंबरला 'नक्षलवाद्यांना आश्रय देता' या आरोपाखाली कार्यकर्त्यांना ग्रामपंचायत कार्यालयात रात्रभर मारहाण व छळ सहन करावा लागला. सकाळी त्या सगळ्यांना दोरखंडाने जीपला बांधून जीपमागे ६ कि. मी. धावायला लावले. नंतर तिघांना तुरुंगात पाठवले. अशा प्रकारची अमानुष छळाची उदाहरणं अनेक गावात आढळतात.

मध्यप्रदेश पोलिसांनी ५ मार्चला बस्तरमधल्या; परंतु गडचिरोलीला लागून असलेल्या ताडबेली गावात गणपती नावाच्या एक नक्षलवादी संघटकाला गोळी मारून ठार केले. 'चकमकीत ठार'च्या वृत्तपत्रातील बातम्या वाचून दोन पत्रकार घटनास्थळी जाऊन पहाणी करून आले असता गणपती झोपलेला असताना त्याला जवळून गोळी मारली गेली असे त्यांना आढळले. त्याचे सहकारी पळून गेले.

संघटनेने यावर्षी २१ रुपये शेकड्याची मागणी केली आहे.

अनुराधा गांधी

२४।४।८५

अर्थपूर्ण वाटले. त्याने ते व्यथेसह पोहोचवलेही तितक्याच ताकदीने. महत्त्वाच्या व्यक्तिरेखांसाठी हौशी कलाकारांवर अधिकतेने विसंबून राहून भागणारे नसते. त्यांचे 'हौशीपण' अंती प्रयोगाला त्रासाचे ठरणारे असते !

प्रयोगाचे दिग्दर्शक आहेत दिवाकर पांडे. त्यांनी रंगमंचाचा विस्तार आणि आकार मोठा ठेवला होता. सुमारे आठ हजार चौरस फूट. डाव्या-उजव्या बाजूंचे कोन सोडले तर बाकी मंच एकाच सरळ रेषेत होता. सिंहासनाचा मधला भाग सोडला तर या मंचावर स्तरनिविष्ट (लेव्हल्स) वापर झाला नाही. तसे घडते तर निरनिराळ्या प्रसंगांचा परिणामही बदलला असता. पार्श्वभागी पडद्याचा वापरलेला निळा रंग बहुसंख्य पात्रांच्या विशेषत: रंगीत कपडे परिधान करणारांच्या संदर्भात अर्थहीन ठरला. कलाकारांच्या कपड्यांचे रंग आणि पार्श्वपडद्याचा रंग यांचा मेळच जमला नाही. तसेच खटावकरांनी तयार केलेली भवानीची मूर्तीही तशीच दुर्लक्षित राहिली. त्या मूर्तीला अंतराचे परिमाण देऊन (डेप्थ देऊन) प्रकाशयोजनेने ती भव्यता-दिव्यता मोठ्या प्रमाणात वापरता आली असती. ते अजूनही करणे शक्य आहे. तसेच दृश्य माध्यमाचा आधार घेतल्यावर अफझलखानाचा वध प्रत्यक्ष का दाखवला नाही ? तो वर्णनात का ठेवला असा प्रश्न मनी आला.

हे सारे सांगत असताना या प्रयोगामागची श्रमांची, पैशांची, वेळेची गोष्ट किती आणि काय आहे याचा मला अंदाज आहे. त्याबद्दल सहानुभूतीही आहे. तसेच हा प्रयोग इतक्या चिकित्सेने तपशिलात पाहणे जनसामान्यांना आवडणारे नाही. ते शिवप्रेमाने हा प्रयोग पाहणार. यथायोग्यपणे असणारे शिवप्रेम मलाही आहे; पण तेवढ्याने प्रयोगाची गुणवत्ता मोठी व्हायला मदत होणार नाही. शिवप्रेमाबरोवरच प्रयोगाची निर्मितीमूल्येही अधिक काटेकोर, जाणतेपणाची असावीत ही अपेक्षा, म्हणून हा लेखनप्रपंच !



चित्रपट

# 'शोले'ची भ्रष्ट नक्कल— 'आँधी तूफान'

हिंदी चित्रपटातील सूडाचा प्रवास खऱ्या अर्थाने 'शोले'च्या अफाट यशापासून सुरू झाला. सलीम–जावेदची सुरेख बांधणी केलेली प्रभावी पटकथा, कलाकारांचा चांगला अभिनय आणि या विषयाची वेगळ्या पद्धतीनं केलेली हाताळणी यामुळे 'शोले'ला प्रेक्षकांनी उचलून धरलं आणि मग वेगवेगळ्या कारणासाठी नायक किंवा नायिका खलनायकावर (आणि प्रेक्षकांवरही) सूड उगवत आहेत अशा पद्धतीची कथा असलेल्या चित्रपटांचा ओघच सुरू झाला.

बी. सुभाष दिग्दर्शित ताजा'आँधी तूफान' हा चित्रपटही या सूडकथांच्या परंपरेतलाच आहे. दिग्दर्शकाने तो अतिशय प्रामाणिकपणे दिग्दर्शित केला आहे. म्हणजे असं की इतर चित्रपटांवर 'शोले'चा प्रभाव असला तरी त्यांच्या कथेत थोडा तरी वेगळेपणा आढळायचा. 'आँधीतूफान'ची कथा मात्र सहीसही 'शोले' सारखी आहेच; पण 'शोले' तले कितीतरी प्रसंगही जसेच्या तसेच उचलले आहेत. अर्थात इतका प्रामाणिक प्रयत्न करूनही विस्कळीत पटकथा, सुमार दिग्दर्शन आणि त्याहूनही सुमार छायाचित्रण यामुळे 'आँधी तूफान' 'शोले'च्या जवळपासही जाऊ शकलेला नाही हा भाग वेगळा.

इन्स्पेक्टर रणजित (शशीकपूर) हा एक साहसी पोलीस अधिकारी. कुप्रसिद्ध डाकू बलबीर (डॅनी) हा त्या भागात धुमाकूळ घालत असतो. त्याला पकडायची रणजीतला जबरदस्त इच्छा असते. इतकी की त्याचा ठावठिकाणा कळल्यावर आपल्या लग्नाच्या दिवशीही जाऊन तो त्याला पकडून आणतो. अर्थात त्यामुळं बलबीर सूडानं पेटलेला. त्याच दिवशी त्याचे साथीदार त्याची सुटका करतात. आता इतक्या खतरनाक डाकूवर नजर ठेवण्यासाठी फक्त एकच पोलीस कसा काय बुवा, असले प्रश्न इथं उपस्थित होत नाहीत. तर सुटल्यावर बलबीर थेट रणजितच्या घरी येतो आणि त्याच्यासकट त्याच्या घरातल्या साऱ्यांची हत्या करतो.

अर्थात इतर सगळेच मरण पावले तरी सूड घ्यायला कोणीतरी शिल्लक हवं म्हणून या सगळ्या हत्याकांडातून रणजीतच्या नूतन पत्नीला शीलाला (हेमामालिनी) मात्र दिग्दर्शकानं जिवंत ठेवलंय. बलबीरचा सूड घे असं नवऱ्यानं सांगितल्यानं ही अर्थातच सूडानं पेटलेली. पण ती एकटीच हे काम करायला लागली तर चित्रपटातल्या खऱ्याखुऱ्या हिरोंना कसा वाव मिळणार ? म्हणून ती हे काम रघू (शत्रुघ्न सिन्हा) व बल्लू (मिथुन चक्रवर्ती) या धाडसी गुंडांकडे सोपवते.

इतकी सगळी पूर्वतयारी झाल्यावर सबंध चित्रपटभर पाठलाग, खून, मारामाऱ्या दाखवायला दिग्दर्शक मोकळा झालाय. एकदा बलबीरला शीलाच्या हाती सोपवायची कामगिरी हातात घेतल्यावर हे दोघे वीर जीप, मोटारसायकल, घोडा यापैकी मिळेल त्या वाहनानं बलबीरचा पाठलाग करत रहातात. दरम्यान बल्लू गावातल्या वारच्या मालकाच्या (ओम शिवपुरी) मुलीच्या (मीनाक्षी शेषाद्री) प्रेमात वगैरे पडतो. अखेर हे दोघेजण आपल्या कार्यात सफल होतात. मात्र यात रघूचा बळी जातो.

ही कथा लिहिली आहे राम केळकर यांनी. मात्र कथा लिहिली म्हणजे नेमकं काय केलं आहे हे कोडं काही तुमच्या–आमच्यासारख्या प्रेक्षकाला उलगडत नाही. कथेत अनेक त्रुटी राहून गेल्या आहेत. शीला रहात असलेल्या गावात बलबीर व त्याचे साथीदार धुमाकूळ घालताना दाखवलेत. आता दाही दिशा मोकळ्या असताना त्यांना हेच गाव इतकं प्रिय का असावं हा एक प्रश्न पडतो बरं गावात एवढी दहशत असूनही व्हिस्कीच्या बाटल्या, थोडेफार पैसे याशिवाय बिचाऱ्यांना काहीच मिळत नाही. दूरवरून मोटारसायकलचं पेट्रोल वगैरे खर्च करून इतका आरडाओरडा करत यायचं आणि एवढंच घेऊन परतायचं म्हणजे नुकसानच की.बरं या काळात पोलिसखातं नेमकं काय करीत असतं याचा उल्लेख नाही. लोकही अत्यंत समजूतदारपणा दाखवून पोलिसांकडे तक्रार देऊन त्यांना त्रास द्यायच्या भानगडीत पडत नाहीत.

रघू व बल्लू प्रथम व्यावसायिक दृष्टिकोनातून हे काम स्वीकारतात. पण नंतर ते भावनिकरित्या त्यात कसे गुतत जातात हेही चित्रपटात नीट दाखवलेले नाही. तीच गोष्ट रघूला शीलाबद्दल वाटणाऱ्या ओढीची. शीला काहीही उद्योग करत नसतानाही इतक्या ऐषारामात कशी राहू शकते हेही स्पष्ट होत नाही.

प्रमुख पात्रांपैकी हेमामालिनी आणि शत्रुघ्न सिन्हा याची निवड फसलेली आहे. हेमामालिनीन अतिशय ठोकळेबाज अभिनय केला आहे. जे काही चाललं आहे त्याच्याशी आपला काहीही संबंध नसल्यासारखी ती चित्रपटभर वावरते. लाँगशॉटमध्ये ती चागली दिसते. पण क्लोजअप्समध्ये मात्र तिचं वय जाणवतं. चित्रपट कोणताही असो किंवा भूमिका कशीही असो त्या भूमिकेत न शिरता शत्रुघ्न सिन्हा हा शत्रुघ्न सिन्हा म्हणूनच वावरतो हा जुना सिद्धात त्यानं पुन्हा एकदा इथं सिद्ध केला आहे.

चित्रपटातल्या आपल्या भूमिकात खरे शोभले आहेत ते मिथुन चक्रवर्ती आणि मीनाक्षी शेषाद्री. पात्राच्या भाऊगर्दीमुळे मिथुनसारख्या गुणी अभिनेत्याला फारसा वाव मिळाला नसला तरी त्यान आपल काम चोख केलं आहे. तीच गोष्ट मीनाक्षीची. डॅनीनंही बलबीरच्या भूमिकेत व्यवस्थित काम केलं आहे शशीकपूर, राजकिरण, काजलकिरण हे खास भूमिकेत चमकतात.

चित्रपटाचं छायाचित्रण सुमार आहे अनेकदा पडद्यावरची चित्रं अतिशय धूसर दिसतात.

चित्रपट हाणामाऱ्या, खून अशा गोष्टीनी परिपूर्ण असल्यान संगीतकार भप्पी लाहिरीला आपला परिचित सूर पुन्हा एकदा सापडला आहे. अशा चित्रपटात शोभेल आणि कानाला अजिबात गोड लागणार नाही अशी दक्षता घेऊनच संगीत दिल आहे

— सीमा कुलकर्णी

विज्ञान

# सागरी रसायनशास्त्र – नवे आव्हान

डॉ. सुभाषचंद्र सारंग

पृथ्वीवरील महासागर हे अति प्रचड असे गतिमान रासायनिक संयत्र आहे. या सयत्रामध्ये असंख्य रसायनाच्या परस्पर प्रक्रियाची मालिका सातत्याने चालू असते. सेंद्रिय व असेंद्रिय असे दोन्ही प्रकारचे रासायनिक घटक या यत्रणेमध्ये परस्पराच्या समीप असतात. या संयंत्राच्या वरच्या पृष्ठभागाशी वातावरण व सौरशक्ती याचा परिणाम होत असतो तर तळाशी गाळाचे थर आणि ज्वालामुखी प्रक्रियाचा परिणाम होतो. अशाप्रकारे या रासायनिक संयत्राच्या दोन विस्तृत अशा पृष्ठभागाचा परस्पर भिन्न स्वरूपाच्या पर्यावरणाशी सबध येत असतो महासागराच्या वरच्या पृष्ठभागावर वातावरणातील वायू, धूळ,पाऊस, वैश्विक धूळ व सूर्य प्रकाश इ चा परिणाम होत असतानाच ऊर्जेचा जो मोठ्या प्रमाणावर विनिमय होतो त्याचा पृथ्वीवरील हवामानावर व्यापक परिणाय दिसून येतो महासागरामध्ये गाळाचे सचयन होण्याची क्रिया अव्याहतपणे चालू असते. हे गाळाचे थर तळाशी साठत असताना ज्वालामुखी उद्रेकामुळे बाहेर पडणारा लाव्हा, असख्य प्रकारचे वायू इ. च्या सपर्कात येतात व औष्णिक व रासायनिक क्रियाची श्रृखला निर्माण होते अशा या प्रचंड सयत्राने पृथ्वीचा ३६ कोटी चौ. कि. मी. म्हणजेच ७० टक्के भाग व्यापला आहे. निसर्गामध्ये या सारखे प्रचड रासायनिक संयंत्र दुसरे नाही.

जमिनीवरील जैविक आणि अजैविक प्रक्रियांवर महासागराचे खोल परिणाम होतात. त्याचबरोबर महासागरातून विपुल सागरी संपत्ती उपलब्ध होत असते. मानवाने सागराचे महत्त्व ओळखून त्याचा अधिकाधिक उपयोग करून घेण्यास सुरुवात केली आहे, पण त्यामुळे सागरांच्या सखोल अभ्यासाची आवश्यकता निर्माण झाली आहे. या अभ्यासाचे स्वरूप आंतर विद्याशाखीय (इंटर डिसिप्लिनरी) आणि बहु विद्याशाखीय (मल्टी डिसिप्लिनरी) आहे. त्यामध्ये भौतिकशास्त्र, भूगर्भशास्त्र, जीवशास्त्र, रसायनशास्त्र अशा अनेक शास्त्राचा संबध येतो.

सागरजलाच्या रासायनिक गुणधर्मांचा व सागरातील रासायनिक प्रक्रियाचा अभ्यास सुरू झाला तेव्हा त्याचा समावेश 'रासायनिक सागरशास्त्रामध्ये' केला गेला परंतु पुढे त्यातूनच 'सागरी रसायनशास्त्र' हे नवे शास्त्र निर्माण झाले आणि पाहता पाहता या नव्या शास्त्राची व्याप्ती वाढत चालली आहे. सागरजलाची रासायनिक घटना, सागरजलाचे गतीशास्त्र व उष्णज गतीशास्त्र सागरी रसायनांचा वापर, सागरातील विविध अन्नसाखळधाचा अभ्यास, सागरी पर्यावरणावर होणारा प्रदूषणाचा परिणाम, किरणोत्सर्गी द्रव्याचा सागराच्या अभ्यासातील उपयोग अशा नवनव्या अभ्यासविषयाची सागरी रसायनशास्त्रामध्ये भर पडत चालली आहे.

सागरामध्ये रासायनिक द्रव्याची सतत भर पडत असते. ८५ टक्के पदार्थ नद्या-नाले व भूजलातून सागरामध्ये मिसळनात १०टक्के पदार्थ हिमनद्यातून सागरामध्ये येतात तर ५ टक्के पदार्थ सागरी लाटाचे कार्य, वैश्विक धूळ आणि वारा यामुळे समुद्रात मिसळतात. निरनिराळी ८४ मूलद्रव्ये समुद्रात कमी जास्त प्रमाणात आढळतात,असे सिद्ध झाले आहे. इतर अनेक मूलद्रव्ये समुद्रात आहेत पण त्याचे प्रमाण अद्यापी निश्चित करण्यात आलेले नाही. पृष्ठभागाशी हवेतील असख्य वायू सागरामध्ये शोषले जातात. सागरातील सर्व पदार्थ कालातराने सागराच्या तळाशी गाळाच्या रूपाने साठत जातात.

सागरामध्ये अनेक रासायनिक प्रक्रिया सतत चालू अनतात. सागरी जीवाची जीवन-

पल्याच्या गाड्यांवर खरे पहाता मराठी नावाच्या पाट्या असावयास पाहिजेत. कारण इतर राज्यांतून बाहेरगावी जाणाऱ्या गाड्यावर तशा त्या असतात; परतु महाराष्ट्राच्या व विशेषत: मुबईच्या बाबतीत त्याबद्दल अपवाद करण्यात येतो. बोरीबदरसारख्या ठिकाणी स्टेशनवर चौकशी विभागात मराठीतून विचारणा केल्यास उत्तरे मिळत नाहीत. कारण तेथे मराठी भाषा कळणाऱ्याना स्टाफला ठेवण्याची गरज भासत नाही. महाराष्ट्रात, तामिळनाडूप्रमाणे सर्व न्यायालयीन कामकाज मराठीत करता येणे शक्य आहे, असे मुबई उच्च न्यायालयाचे मुख्य न्यायमूर्ती के. माधव रेडी सांगतात; परतु त्याची दखल घेणे रौप्य-महोत्सवी वर्षात महाराष्ट्र शासनाला महत्त्वाचे वाटत नाही. महाराष्ट्राचे मुख्यमंत्री कर्नाटकाच्या मुख्यमंत्र्याबरोबर सोमा प्रश्नावाबत वाटाघाटी करताना कानडी शाळावरील बंदी उठवतात व वीज देऊन मोकळे होतात ( कर्नाटकाला ) मात्र त्या बदल्यात आश्वासनाशिवाय त्यांना काही मिळत नाही. असे कित्येक अन्याय सांगता येतील, त्याना शेवटच नाही.

अजूनही मराठी माणूस सघटीत होत नाही. जेव्हा सघटित होईल तेव्हा वेळ निघून गेलेली असेल किंवा आसामसारखे उग्र आंदोलन परप्रांतीयाच्या घुसखोरीवरून मुबईत होईल व त्यामुळे जो हिंसाचार होईल, त्यास केवळ महाराष्ट्र शासनच जबाबदार असेल. कोणत्याही परिस्थितीत ही वेळ टाळावयास हवी. परतु मराठी माणसाच्या सहनशक्तीचा अत पहाणाऱ्या महाराष्ट्र शासनास व अखिल भारतीय पक्षांच्या मराठी नेत्यास ही सुबुद्धी केव्हा येणार ? हा अन्याय केवळ मुबईपुरताच मर्यादित नाही. महाराष्ट्र शासनाच्या तटस्थ व निष्काळजीवृत्तीने बरेच कारखाने महाराष्ट्राबाहेर जात आहेत. दिल्लीमध्ये महाराष्ट्राबद्दल तळमळीने बोलणारे नेते अभावानेच आढळतात. महाराष्ट्राच्या समस्याना व अडचणीना केन्द्रीय नेत्याकडून वाटण्याच्या अक्षता लावण्यात येतात. त्यांच्याकडून यासंबंधी उडवाउडवीची उत्तरे देण्यात येतात व त्याचा महाराष्ट्र शासनाकडून पाठपुरावा करण्यात येत नाही. दिल्लीतील महाराष्ट्राचे खासदार बगाल, तामिळनाडूप्रमाणे महाराष्ट्रासबंधी व मुबईसबंधी विषयावर एकजुटीने भाडताना दिसत नाहीत. त्याचे प्रमुख कारण म्हणजे मुबईतील अमराठी खासदाराना मुबईतील मराठी माणसाच्या समस्याविषयी आस्था नाही व तशी त्यांच्याकडून अपेक्षाही करता येणार नाही. मात्र मुंबई बाहेरील खासदारही जेव्हा या बाबतीत आत्मीयता दाखवत नाहीत तेव्हा अमराठी खासदाराना दोष दिल्याबद्दल वाईट वाटते. मराठी माणसाची हीच खरी शोकांतिका आहे.

---

सांस्कृतिक दिल्ली

# दस्तकारी बाझार

दिल्लीतील मडी हाऊसचे ट्रॅफिक आयलड (गोल चक्कर) खूप भव्य आहे. सात मोठे रस्ते त्याला येऊन मिळतात. कोपऱ्यावर कारंजी थुयथुयत असतात. वाऱ्याबरोबर वहात येणारे त्याचे तुषार पादचाऱ्यांना थंडावा देत असतात. एका कोपऱ्यावर अखड नाट्योत्सव घडविणारे श्रीराम सेंटर आहे. एका रस्त्यावर साहित्य अॅकॅडमी, एका रस्त्यावर नृत्य-संगीत विद्यालय तर एका रस्त्यावर नित्य नृत्योत्सव घडविणारे 'कमानी ऑडिटोरियम'. तरीही येथील एकूण परिसर अगदी निवात, शात आहे. वाचनालयाला अनुकूल असलेल्या अशा परिसरातच प्रादेशिक वाचनालयाची इमारत आहे. भारतातील सर्व भाषातील पुस्तके येथे त्या त्या विभागात उपलब्ध आहेत.

परवा या वाचनालयातून मी बाहेर पडले आणि समोरच असलेल्या हिमाचल भवनच्या उंच इमारतीजवळ माझे लक्ष वेधले गेले. त्याच्या कुंपणालगत समान अंतरावर सॅटीनचे रंगीबेरंगी उंच झेंडे फडकत होते इथे काही तरी विशेष आहे खास, असे माझ्या मनात आले आणि नकळतच पाय तिथे वळले. कुंपणाच्या आतील काही भागात मंडप घातला होता अन् अग्रभागी अक्षरे झळकत होती 'दस्तकारी बाझार' म्हणजे हस्तकलेचे प्रदर्शन

भारतातील अनेक राज्यांतून आपापल्या हस्तकौशल्याचे अनेकविध नमुने घेऊन कलाकाराचे सघ इथे आले होते. माती, लाकूड, कापड, ताल, पेलम इत्यादी साधनसामुग्रीतून मजबूत आणि कलापूर्ण केलेली निर्मिती खरोखर स्तुत्य आणि खरेदी करणाऱ्यांच्या पैशांचा पूर्ण मोबदला देणारी वाटली. कुपणाजवळील मंडपात लाकडी कामातील कलाकुसर पहायला मिळाली. आंध्रप्रदेशातील चित्तूर येथील सघ आणि उदयपूर येथील 'झामेश्वर बुनकर सहकारी समिती' यानी लाकडात कोरीव काम करून तयार केलेल्या अनेक वस्तू माडून ठेवल्या होत्या. काळ्या आणि पिवळ्या लाकडाच्या आडव्या पट्ट्यांमध्ये कोरलेल्या नृत्यांगना, देव-देवता, नारद-तुबर, लक्ष्मी, सरस्वती, गणेश इत्यादी प्रतिमा फार सुरेख दिसत होत्या. या शो-पीसेसची किंमत रु. २५० ते रु. ३५० पर्यंत होती. या ठिकाणी अर्थातच खरेदीचा उत्साह फारसा नव्हता. तथापि शेजारच्याच स्टॉलवरील, लाकडापासून केलेल्या नित्योपयोगी विविध वस्तू त्यावरील कलाकुसरीमुळे लोकांना आकर्षून घेत होत्या. ५ रुपयांपासून १०० रुपयापर्यंतच्या या वस्तूमध्ये लोणच्यासाठी काटे-चमचे, पेन-होल्डर्स, पितळेच्या नाजुक पानफुलांनी जडवलेले किल्ल्या अडकविण्याचे लाकडी स्टॅंड, फळांच्या खोलगट घाटदार डिशेस, छोट्या २ ते ६ इंची पेट्या, खेळणी इत्यादी प्रकाराचा समावेश होता. या ठिकाणी कलाप्रेमी लोक आपापल्या खिशाला परवडेल अशी खरेदी करीत होते. वस्तू भराभर खपत होत्या.

राजस्थान येथील 'जवाजा वीवर्स असोसिएशन' तर्फे तयार झालेल्या मजबूत जाड धाग्याच्या सतरंज्या जणू 'लाइफ लॉंग गॅरंटी' देत होत्या. बसण्याची छोटी आसने आहेत का म्हणून मी चौकशी केली, तर 'वो तो सब खतम हो गया बहेनजी, अब नहीं मिलेगी' असे उत्तर मिळाले. विक्री किती धडाक्यात झाली याची मला काहीशी कल्पना आली. 'वरळी प्रिंटिंग, महाराष्ट्र' तर्फे हाताने तयार केलेल्या कागदावरची भेटकार्डे नाविन्यपूर्ण वाटली. दिल्लीच्या 'भूले बिसरे कलाकार' यांनी अनेक कठ-

पुतळ्या (पपेट्स) मांडून ठेवल्या होत्या. बंगालच्या 'झरन गोनाई सेल्फ हेल्प हॅंडीक्राफ्ट्स सोसायटी' ने भरतकाम केलेल्या मजबूत कापडी पिशव्या, छोट्या कापडी पर्सेस, साड्या, कुशनकव्हर्स, कॉकटेल नॅपकीन्स, भरतकाम केलेले कापडी टेबल मॅट्स, इत्यादी अनेक वस्तू मांडल्या होत्या. विक्रीही जोरात चालू होती त्या विक्रेतीला मी विचारले 'आप ये सारा माल कैसे ले आये?' तिने सांगितले की दिल्लीपर्यंत आम्ही रेल्वेने माल आणला, परंतु स्टेशनवरून इथे पोहोचेपर्यंत पोलिसांनी बराच त्रास दिला. ते उगीचच आमच्याजवळ येत आणि सरळ 'दस रुपया निकालो' असे म्हणत. त्यांना पैसे का द्यायचे हे आम्हाला समजतच नव्हते' तिच्या असहाय मनाचे हे बोलणे मनात कुठे तरी जाऊन भिडले. आपल्याकडील कलेला आणि कलावंतांना प्रोत्साहन, उत्तेजन मिळण्याऐवजी जर असे उद्वेगजनक अनुभव मिळू लागले तर या कलांची बूज राहणार नाही. कला नामशेष होत जातील. आपल्या कष्टाने आणि कलेच्या साधनेने निर्माण केलेल्या या वस्तूंची विक्री आणि प्रदर्शन मांडण्याची संधी पाहून अंतर्यामी सुखावलेले हे कलाकार, अशा उपटसुंभ, पैसेखाऊ लोकांच्या सापळ्यात जर अडकले तर ती त्यांच्या कलांची मानहानीच नव्हे का? किंबहुना समाजाच्या संरक्षकानीच अशी गळचेपी चालवली तर यापरती लाजिरवाणी गोष्ट नाही. मला तेव्हा ७–८ महिन्यापूर्वी पाहिलेल्या चिनी हस्तकलेच्या प्रदर्शनाची आठवण झाली. तिथे सरकार या हस्तकलांना किती महत्त्व देते आणि त्यांचा विकास घडवून आणण्यासाठी किती प्रयत्नशील असते हे त्या प्रदर्शनात पावलोपावली प्रत्ययास येत होते. आपल्याकडे त्याच्याविरुद्ध परिस्थिती दिसत होती.

पहिल्या मजल्यावरवर प्रदर्शनाचा पुढील भाग होत. तामिळनाडूच्या स्टॉलवर टोपल्या बास्केट्स इत्यादी विविध आकर्षक वस्तू होत्या. सोलापूरच्या हातमाग विणकर संस्थेच्या साड्या, खण येथील लोकांना नवीन वाटत होते. लखनौच्या 'सेवा सधा'-तर्फे लखनवी चिकनच्या साड्या, कुडते नाजुक कलाकुसरपूर्ण भरतकामाचे जणू एक एक नमुने होते 'गौरी हॅंडीक्राफ्ट' या ओरिसाच्या स्टॉलवर बॉक्सेस, पटचित्रे (भिंतीवर अडकवण्याची हाताने रंगवलेली चित्रे), खेळणी, तालपत्र (पात्रलिव्ह), उत्तरप्रदेशची ब्लॅक पॉटरी (मातीची काळीभोर भांडी), आंध्रप्रदेशातील हमडा लेदरच्या विविध वस्तू, मद्रास येथील बाटिक प्रिंट पॅचवर्क, राजस्थानची कलमकारी इत्यादी वस्तू अगदी नाविन्यपूर्ण आणि कलापूर्ण वाटल्या. तेथील एका स्टॉलवरील विक्रेत्याने सांगितले, 'अहो परवा तर दहा–बारा जणांच्या टोळक्याने सहा साड्या चोरून नेल्या, पैसे आता आम्हालाच भरावे लागणार.' आमच्या कलाकारांना मिळणारे हे प्रोत्साहन!

एका गोष्टीचे मात्र फार समाधान वाटत होते. दिल्लीतील लोकांना अशा हस्तकलेची आणि वस्तूंची मनापासून आवड आहे. अशी प्रदर्शने भरली की दिल्लीकर तेथे पहिल्या दिवसापासूनच गर्दी करतात, आवडीने आणि जाणतेपणाने खरेदी करतात निदान हे रसिक ग्राहक या कलाकाराच्या कलेला नकळत प्रोत्साहन देत असावेत, हीच त्यातल्यात्यात जमेची बाजू

–ललिता मिरजकर

---

# परीक्षांचे दिवस

---

दिल्लीमध्ये सध्या परीक्षांचा मोसम चालू आहे विद्यापीठातील पदव्युत्तर वर्गांच्या परीक्षा चालू आहेत. महाविद्यालयाच्या परीक्षा लवकरच सुरू होत आहेत. दहावी–बारावीच्या बोर्डाच्या परीक्षा गेल्या महिन्यातच उरकल्या. शाळांमधल्या परीक्षांच्या बाबतीत दोन तऱ्हा दिसतात. काही शाळांच्या परीक्षा संपून निकालही लागले; आणि नवीन वर्गाच्या नवीन वर्षाच्या अभ्यासक्रमाला सुरुवातही झाली. तर काही शाळांच्या परीक्षा अजून चालू आहेत.

तसे म्हटले तर परीक्षांचे दिवस इथूनतिथून सर्वत्र सारखेच. दिल्लीत काय, किंवा महाराष्ट्रात काय परीक्षांचे वातावरण एकच तेच घाबरगुंडी उडालेले कोवळे चेहरे, तीच गडबड–धांदल, शेवटच्या क्षणी पुस्तकातली जास्तीत जास्त माहिती डोक्यात कोंबण्याची तीच केविलवाणी धडपड, वर्षभर वेळ वाया घालवल्याची तीच चोरटी अगतिक जाणीव... सारे तेच. एक निराळेच तणावयुक्त चैतन्य वातावरणात भरून राहिलेले. मुले आणि त्यांचे पालक यांना व्यापून असलेले.

दिल्लीला नवीन नवीन आल्यावर विद्यापीठातल्या परीक्षांचे काही बाबतीत मात्र महाराष्ट्रातल्या विद्यापीठापेक्षा असलेले वेगळेपण विशेषत्वाने जाणवायचे. परीक्षेच्या वेळा हा त्या वेगळेपणाचा पहिला पैलू. दिल्लीतल्या तीव्र उन्हाळ्यामुळे पेपरची वेळ सकाळी ९ ते १२ किंवा सध्याकाळी ३ ते ६ अशी ठेवलेली उत्तरपत्रिकांचे आकार चौरसाकृती. उत्तरपत्रिकेवर पर्यवेक्षकाने स्वाक्षरी करण्याची पद्धत नाही विद्यार्थ्यांची स्वाक्षरी मात्र उपस्थितीपत्रकावर घ्यायची. प्रत्येक पुरवणीगणिक पुरवणीच्या नोंदतक्त्यात विद्यार्थ्यांची स्वाक्षरी घ्यायची

दिल्लीच्या सामाजिक संस्कृतीतला मोकळेपणा परीक्षागृहातही दिसून येणारा पेपर सुरू झाल्यावर अर्ध्या तासाने पर्यवेक्षकासाठी चहा येणार. तो विद्यार्थ्यांच्या समोर घ्यायला पर्यवेक्षकांनी संकोच मानायचा नाही. विद्यार्थ्यांपैकी कोणाला चहा घ्यावासा वाटला तर पर्यवेक्षकांना सांगून तो सरळ आपल्या टेबलावर चहा मागवून घेतो. कधीकधी एखादा विद्यार्थी आपल्या चारपाच मित्रांसाठी आणि पर्यवेक्षकासाठीही एकदम चहा मागवतो. धूम्रपान करणारा विद्यार्थी वर्गाबाहेर उभा राहून सिगारेट ओढून येतो किंवा आजूबाजूच्या विद्यार्थ्यांची हरकत नसेल तर सिगारेटचे झुरके घेतघेत पेपर लिहायला संकोच करीत नाही.

प्रश्नपत्रिका अभ्यासक्रमाबाहेरच्या विषयावर काढली, किंवा अचानक प्रश्नपत्रिकेचे स्वरूप बदलले, तर विद्यार्थी संघटितपणे आपली प्रतिक्रिया व्यक्त करतात. म्हणजे परीक्षेला बसायचे नाकारतात, किंवा कुलगुरूकडे तक्रार–अर्ज घेऊन जातात. अशावेळी त्यांच्यातली एकी वाखाणण्यासारखी असते. एकही विद्यार्थी त्यावेळी फुटून निघत नाही. विद्यापीठाने निवडक प्राध्यापकांचे एक 'चेकिंग स्क्वाड' नेमलेले असते. ही तपासणी–फौज सर्व परीक्षाकेंद्रांना भेटी देते.

ध्यानीमनी नसता अचानक या फौजेचे सदस्य परीक्षागृहात घुसतात, आणि काकदृष्टीने सर्व विद्यार्थ्यांकडे बारकाईने पाहतात. संशय येणाऱ्या विद्यार्थ्यांची लगेच झडती घेतात. त्यांच्याकडे आक्षेपार्ह काही सापडल्यास लगेच त्याची 'केस' तयार करण्यात येते. त्यावर पर्यवेक्षकाच्या सह्या घेऊन ती तडक परीक्षा-विभागाकडे पाठविण्यात येते. अशा विद्यार्थ्या-वर कठोर कारवाई करण्यात येते.

दहावी–बारावीच्या परीक्षांच्यावेळी विशेष हुरहुरीचे वातावरण जाणवते. शालेय जीवनाच्या अंतिम टप्प्यावरच्या या महत्त्वाच्या परीक्षांच्या बाबतीत पालकही विद्यार्थ्यांइतकेच हळवे झालेले असतात. शेवटच्या क्षणापर्यंत 'बाळा' ला सूचना देण्याचे काम चालू असते. 'गडबड करू नकोस. सर्व प्रश्न आधी नीट वाचून घे शेवटी पेपर तपासून पहा.' इथपासून 'गरम व्हायला लागलं तर पखा जोरात सुरू करायला साग. चक्कर आली तर डॉक्टराना बोलवायला साग.' इथपर्यंतच्या त्यांच्या शेवटच्या क्षणाच्या सूचना ऐकल्या की, प्रांत बदलला, भाषा बदलली तरी सगळीकडे एकच मन असते हे पटायला लागते. प्रश्नपत्रिकेवरच्या प्रतिक्रियाही एकाच छापाच्या. यंदा दहावीच्या बायॉलॉजीची प्रश्नपत्रिका इतकी विचित्र काढलेली होती की पेपर सुटल्यावर अक्षरशः प्रत्येक विद्यार्थी वा विद्यार्थिनी त्यावर अगदी तावातावाने बोलताना दिसत होती. महत्त्वाचे सगळे ढोबळ विषय अजिबात वगळून अगदी कोनाकोपऱ्यातले प्रश्न विचारण्यात आलेले होते !

शाळांच्या परीक्षामध्ये आणखीनच करमणूक. दहावी–बारावीचे किंवा कॉलेजातले विद्यार्थी निदान स्वतःच्या अभ्यासाचे एकतर स्वत. भान ठेवतात किंवा त्याची बरीवाईट फळे चूपचाप निमूटपणे भोगतात. शाळामधली पोरे वर्षभर खेळ आणि टी. व्ही. यात स्वत.ला हरवून बसलेली असतात. शाळेतून आल्याबरोबर पोटपूजा करून हुंदडायला पळावे आणि दिवेलागणीनंतर घरात येऊन टी. व्ही. च्या खोक्यासमोर बसून डोळ्यावर झापड येईपर्यंत वेळ (अक्षरश. वाया) घालवावा, हा त्यांचा नेहमीचा रूटिन कार्यक्रम. परीक्षा तोंडावर आली की त्यांच्या पालकांची घालमेल होऊ लागते. मग पोरावर आरडाओरड करणे, वाट्टेल तितकी फी कबूल करून खाजगी शिकवण्यांना पोरे पाठवणे वगैरे प्रकार सुरू होतात. एकेका विषयासाठी महिना दोन–दोनशे रुपये शिकवणीला द्यायलाही इथले पालक तयार असतात. एवढ्यावर न थांबता, प्रश्नपत्रिका काढणाऱ्या शिक्षकाची शिकवणी मिळवणे, त्या शिक्षिकेला महागड्या वस्तू भेटीदाखल देऊन खूष करणे आणि तिच्याकडून आधीच प्रश्न करून घ्यायला लावणे, या गोष्टी विद्यार्थ्यांच्या समोर अगदी बिनदिक्कत केल्या जातात असे करताना त्या विद्यार्थ्यावर आपण कोणते संस्कार करतो याचे भान तर अशा पालकांना नसतेच; शिवाय या मार्गांनी आपल्या पोराला ज्ञान मुळीच प्राप्त होणार नाही, फक्त तो वरच्या वर्गात ढकलला जाईल, आणि पुढे त्याचे जास्त नुकसान होईल, याचीही फिकीर नसते. तरी एक बरे आहे की, सध्या शाळामध्येही केवळ वार्षिक परीक्षेच्या गुणांकनाला महत्त्व नसून वर्षभराच्या सर्व परीक्षांचे गुण एकत्र करण्यात येतात.

काही शाळामध्ये परीक्षेचा निकाल पोस्टाने घरी पाठवतात. पण काही शाळामध्ये निकाल जाहीर करण्याचा विशेष समारंभ असतो. सगळ्या शाळेतले विद्यार्थी उत्सुकतेने उपस्थित असतात. त्याचे पालकही आलेले असतात. शाळेचे प्रिन्सिपॉल प्रत्येक वर्गातल्या पहिल्या तीन क्रमांकाची नावे सर्वांसमोर जाहीर करतात, आणि त्यांचे निकालपत्रक समारंभपूर्वक त्यांच्या हाती देतात. टाळ्यांच्या कडकडात पुढे जाऊन निकालपत्रक घेताना विद्यार्थ्यांच्या चेहऱ्यावर उजळलेला अभिमान आणि आनंद अवर्णनीय असतो पुन्हा आकस्मिकपणे हा गौरव जाहीर झाल्याचे सुख काही वेगळेच असते. प्रत्येक वर्गातल्या पहिल्या तीन क्रमाकाचा निकाल असा समारंभाने साजरा केल्यावर बाकीच्यांची निकालपत्रके त्यांच्या त्यांच्या वर्गात वाटण्यात येतात.

निकाल लागल्यावर लगेच दुसऱ्या दिवशी नव्या वर्षाची शाळा सुरू होते. वह्यापुस्तके बहुधा शाळेतूनच विकत घ्यावी लागतात. अभ्यासाला लगेच सुरुवात होते. आणि महिनाभर अभ्यास झाल्यावर मग १५ मेस उन्हाळ्याची सुटी पडते. त्यामुळे म्हणून भरपूर गृहपाठ शाळेतून दिला जातो. सुटीमध्ये अभ्यासाशी काही ना काही संपर्क राहतो. परीक्षेच्या निकालानंतर लगेच उन्हाळ्याची सुटी सुरू करून सुटी संपल्यावर नव्या वर्षाचा अभ्यास सुरू करण्याच्या आपल्याकडच्या पद्धतीपेक्षा ही इकडची पद्धत मला अधिक चागली वाटली.

इकडे सुटीमध्ये मुलाच्या विकासासाठी सुटीतले विविध उपक्रमही फार चागले आयोजित केले जातात. पेंटिंग, हस्तकला यांसारख्या गोष्टीपासून ते पोहणे, घोडेस्वारी, फोटोग्राफी, ज्यूडो–कराटे यासारख्या उपक्रमांपर्यंत विविध उपक्रम सुटीमध्ये आयोजित करणाऱ्या अनेक छोट्यामोठ्या संस्था येथे आहेत. 'बालभवन' ही त्यातली सर्वात मोठी सस्था.

पण तशी अधिकृत सुटी सुरू व्हायला अजून वेळ आहे. सध्यातरी दिल्लीमध्ये शाळापासून विद्यापीठापर्यंत सर्व बाल–युवा–जगतात परीक्षाचे दिवस उगवलेलेले आहेत. सपता सपत नाहीत.

–निशिकांत मिरजकर

---

# तळहाती शिर घेऊन... फुटपाथवरून

---

पुण्यात रस्त्यावरून चालताना, आपल्या ध्येयमार्गावरून जराही विचलित न होण्याच्या निर्धाराने समोरून थेट तुमच्याकडेच येणारी गोमाता आणि नेमक्या तुमच्या डाव्या पायाखालच्या रस्त्यावरूनच पुढे जाण्याचा आपला हक्क बजाविणारे एखादे दुचाकी वाहन, या दोहोंना चुकवता चुकवता उजवीकडे असलेल्या एखाद्या फेरीवाल्याच्या हातगाडीवर स्वार व्हायचा प्रसग तर अनेक वेळा येतो. 'गोब्राह्मण-प्रतिपालक' श्रीशिवछत्रपतीच्या पुण्यात ध्येयनिष्ठ गोमातांना मुक्तसचार असावा हे तर स्वाभाविकच आहे. आणि दुचाकी वहानाची निर्मितीच मुळी सारथ्याला थोडी कसरत करून चपळ आणि तदुरुस्त रहाता यावे यासाठी झाली आहे ! म्हणजे राहता राहिले फेरीवाले वयाची पाच वर्षे उलटून गेल्यावरही. पुण्यात रस्त्यावरून 'चालीचाली' करण्याच्या भिरु सवयीचे उच्चाटन व्हावे याचसाठी माझ्या मते रस्त्याच्या कडेकडेने या विक्रेत्यांची योजना केली असावी.

तसे नसेल तर रस्त्याच्या मध्ये जेमतेम

वहाने जातील एवढीच जागा सोडून उरलेल्या सर्व जागेत दोहोबाजूना हे विक्रेते आरामात ठाण माडून बसू शकतात याला दुसरे कारण तरी काय? परवा कुठे तरी वाचले की लष्कर भागातील म. गांधी रस्त्याचा काही भाग केवळ पादचाऱ्यासाठी राखीव ठेवण्याच्या ' कॅंटोन्मेंट बोर्डाच्या ' या योजनेला त्या भागातील व्यापाऱ्याच्या 'पुणे कॅंटोन्मेंट मर्चंट असोसिएशन'ने कडाडून विरोध केला आहे. याउपर त्या योजनेचे पुढे काय झाले ते माहीत नाही; पण काय होणार म्हणा! पादचारी आणि व्यापारी असा भेदभाव ही व्यापारी मडळी कशी काय खपवून घेतील?

हे असे काही मार्ग पादचाऱ्यासाठी अधिकृतपणे राखून ठेवण्याचा पक्षपातीपणा जरी व्यापाऱ्यांना रूचत नसला तरी पुण्यातील पादचाऱ्यासाठी म्हणून बाधलेले काही काही फुटपाथ अनधिकृतपणे का होईना पण जवळजवळ विक्रेत्यांसाठीच राखून ठेवल्यात जमा आहेत. याचे उत्तम उदाहरण म्हणजे लक्ष्मी रस्ता. पुण्याच्या शहर भागातून अगदी पार या टोकापासून त्या टोकापर्यंत पसरलेला आणि दुतर्फा लगडलेल्या हरतऱ्हेच्या दुकानांबद्दल प्रसिद्ध असलेल्या या लक्ष्मीरस्त्याच्या काही काही भागात तर रस्त्यावरून येणाऱ्या-जाणाऱ्या वहानाचा फेरीवाल्याना त्रास होऊ नये म्हणून बांधलाय की काय अशी शंका येते. गरवारे पुलाखालून रस्ता तर बहुधा फेरीवाल्याना उन्हाचा त्रास होऊ नये म्हणून बाधला असावा किंवा लोकाना रस्ता पार करताना या रस्त्याचा वापर करायला आकर्षित करण्यासाठी पुलाखाली हे विक्रेते नेमले असण्याचीही शक्यता आहे.

तसे पहाता पुणेकर मंडळी विक्रेत्याची गर्दी होते म्हणून फुटपाथवरून चालत नाहीत की आपला तरवाचा भाग म्हणून, हाही मोठा प्रश्नच आहे. याउलट काही काही पादचारी केवळ या फेरीवाल्याकडच्या मालाची न्याहाळणी आणि खरेदी करता यावी याच उद्देशाने फुटपाथवरून चालत असावेत असे वाटायला भरपूर जागा आहे. अहो, हे फेरीवाल्याचे आकर्षण तसे जबरदस्त असते. यांच्याकडे काय मिळत नाही? सुया, बटणे, मणी, माळा, पिना, लहान-मोठे कपडे, स्वेटर्स, रुमाल, चपला, डबे, प्लॅस्टिकची भांडी, शोभेच्या वस्तू इ. इ. हरतऱ्हेच्या वस्तू यांच्याकडे मिळतात. दिवसेंदिवस या वस्तूची यादी मारुतीच्या शेपटाप्रमाणे वाढतच जाते आहे. जसजशा लोकाच्या सवयी बदलतात, तसतशा बदलत्या गरजा पुरवायला हे फेरीवाले तयारच असतात. गेल्या दोन-तीन वर्षातच गाऊन्स, मिडीज् आणि 'टी' शर्टस्च्या रस्तोरस्ती लागलेल्या पताका याचेच द्योतक आहेत. शिवाय हा सर्व माल दुकानापेक्षा कमी किंमतीत मिळतो मग लोकाना तो रस्त्यावरून खरेदी करावासा वाटला तर त्यात नवीन ते काय?

या अशा रस्त्यावरच्या खरेदीत, खरेदी करण्यातला आनंदही पुरेपूर मिळतो. पुण्यातले बहुतेक स्वाभिमानी मराठी दुकानदार 'घ्यायचं तर घ्या, नाहीतर जा' अशा थाटात गिऱ्हाईकाची संभावना करतात परत कोणत्याही दुकानात गेलं की 'एकच भाव' च्या पाट्या आपल्या असतातच! उलट रस्त्यावर मात्र ३५ रुपयाना सांगितलेली वस्तू मोठ्या व्यावहारिकतेने आणि चतुराईने २० रुपयाना विकत घेण्यातला आनंद मिळविता येतो. अर्थात हा आनंद दुसऱ्या कोणी तीच वस्तू १५ रुपयाना आणल्याचे सांगेपर्यंतच! पण काही का असेना, दहा–बारा नग पाहून, त्यातल्या प्रत्येकाचे नीट विश्लेषण करून मग भावावरून घासाघीस करून शेवटी पाठ वळविल्यावर विक्रेत्याने 'या ताई तुमचं राहू आमचं राहू द्या' इ. इ. नाट्यमय प्रसंग घडल्यानंतर केलेली खरेदी म्हणजे कसे अगदी विजयश्री खेचून वगैरे आणल्यासारखे वाटते. याखेरीज दुकानात जाऊन केलेली खरेदी अगदी आधी ठरवून केलेली असते. उलट संध्याकाळी काही इतर कारणांसाठी बाहेर पडणारी मडळी रस्त्यावरून एखादी वस्तू अगदी सहज नजरेस पडली म्हणून घेऊन टाकतात एखादी वस्तू नको असताना केवळ दिसली आणि मनात भरली म्हणून घेऊन टाकण्यातही एक वेगळेच सुख असते.

पण हा सगळा आनद शेवटी एका मर्यादेपर्यंतच. म्हणजे तुमच्या आमच्या सारख्या मडळीना थोडे धडपडत–ठेचकाळत का होईना पण चालण्यापुरता रस्ता बाकी आहे तोपर्यंतच. दादरच्या 'रानडे रोड'वरून सध्या काळच्या वेळी 'प्लाझा' कडे जाताना रस्ता कसा इंच इंच लढवावा लागतो याचा अनुभव ज्यानी घेतला आहे त्याना माझ्या या म्हणण्याचा अर्थ समजेल. पुणे महानगरपालिकेने १९७६ सालानंतर अशा विक्रेत्याना परवाने देण्याचे बंद केले आहे. तेव्हापासून आजतागायत त्या जुन्या परवान्याचे फक्त नूतनीकरण केले जाते. म्हणजे त्यानंतर निर्माण झालेल्या सर्व नव्या जागा अनधिकृत आहेत. अतिक्रमण विभागाच्या माहितीनुसार अख्ख्या पुण्यात टिकाऊ माल विकणाऱ्या फक्त १२० फिरत्या गाड्याना आणि स्थिर ३९ ठेल्याना परवाने आहेत. म्हणजे उरलेली विनापरवाना मडळी किती? ते तुम्हीच मोजा. ही अपरिमित वाढ मुळातच 'मनपा' च्या आटोक्याबाहेरची आहे आणि त्यातच स्थानिक राजकीय पुढाऱ्याचा येणारा दबाव आणि अधूनमधून च्या आलेल्या महानगरपालिकेच्या निवडणुका! त्यामुळे फेरीवाल्याच्या या गर्दीवर इतक्यात तरी काही इलाज होण्याची शक्यता दिसत नाही. या फेरीवाल्याना गर्दीच्या रस्त्यावरून जरा आडबाजूच्या गल्ल्यातून जागा द्याव्यात किंवा मंडईवर बाधकाम करून तिथे जागा द्याव्यात अशा काही योजना आहेत. पण त्यावर विचार किंवा कृती एकत्रपणे नाही! यापूर्वीही लक्ष्मी रस्त्यावरच्या काही फेरीवाल्याना अशाप्रकारे जोगेश्वरीच्या रस्त्यावर हलविले होते. पण लक्ष्मी रस्ता तर अगदी द्रौपदीची थाळीच बनला आहे! सतत होणारी ही वाढ लक्षात घेऊन नवीन परवाने देण्याचा विचार आहे पण तेही फारसे सोपे नाही. कारण या फेरीवाल्याच्या युनियन्स बनल्या आहेत आणि हे विक्रेते 'मनपा'ला भाड्याचे पैसे देत नसले तरी आपल्या सघटनाची वर्गणी मात्र भरतात परिणामत: या युनियन्स आपल्या सदस्यांना जुन्या जागांवरून हलावे लागू नये आणि परवाने मिळावेत म्हणून खटपट करणार. एकदर काय वेळीच खबरदारी घेतली नाही तर मग पुण्याची मुबई व्हायला काही फारसा वेळ लागणार नाही. अहो परवाच कॅंपमधल्या एका थेट मुंबईहून आपला माल आणणाऱ्या अशाच एका विक्रेत्याने मला चक्क त्याचे 'व्हिजिटिंग कार्ड' दिले! समस्येचा भस्मासूर बनल्यावर मग खैरनाराप्रमाणे अगदी तळहाती शिर घेऊन तिचा सामना करण्याची वेळ यायच्या आतच या फेरीवाल्यांना आवर घालायचे काही उपाय योजले तर बरे.

— श्रुती मराठे

# रंगपूरची डोळस न्यायसभा



● प्रा. शरद कुलकर्णी ●

सर्वसाधारणपणे न्यायदेवतेचे चित्र काढले जाते त्यात ती आंधळी दाखवितात. तिच्या हातात तराजू असतो; पण त्यातले लोणी कोणत्या बोक्याने आधीच गट्ट केले आहे ते तिला कळत नाही–किंवा कळले तरी तिने ते बोलायचे नसते. तिच्या तोंडावरही पट्टी असते. फक्त निर्णय देताना तिने तोंड उघडायचे.

पण असे चित्र काढले तर–

या न्यायदेवतेला हजार एक डोळे आहेत. (सहस्त्राक्षि) हजार कान आहेत, अनेक तोंडे आहेत. (पट्टी न बांधलेली) या देवतेच्या हातात तराजू नाही; पण एका हातात एक पक्षकार व दुसऱ्या हातात दुसरा–दोन भांडणाऱ्या मुलांना घेऊन आई ज्या ममतेने उभी राहते त्या थाटात.

तुम्ही म्हणाल हे Fiction आहे, स्वप्नरंजन आहे. (किंवा कदाचित म्हणालही की हा वेडगळपणा आहे.)

न्यायासंबंधीच्या ज्या अनेक संकल्पना आहेत त्यातल्या प्रमुख चार कल्पनांचे स्वरूप प्रथम लक्षात घेऊ. पूर्वीच्या काळी बऱ्याच देशात (व अजूनही काही मुस्लिम देशात) जर एखाद्याने चोरी केली तर त्याने ज्या हाताने चोरी केली तो हातच कापून टाकत. जर एखाद्या स्त्रीने परपुरुषाशी संबंध ठेवला तर तिला व काही वेळा त्या पुरुषालाही दगडाने ठेचत. या शिक्षा देण्यामागची भूमिका करू नये व इतरांनीही धडा घ्यावा. त्यांनाही अशी की पुन्हा माणसाने तसा गुन्हा करण्याची भीती वाटावी (Deterent Justice).

न्यायासंबंधीची दुसरी संकल्पना अशी की जर एखाद्याने एखादा गुन्हा केला तर तो त्याने का केला त्याची कारणे शोधून काढून, त्याने तसे पुन्हा वागू नये म्हणून त्याला योग्य शिक्षण देणे. एखाद्याने भुकेपोटी धान्याची चोरी केली असली तर, त्याला काही उद्योग शिकवणे, त्याच्यावर चांगले संस्कार करणे, वगैरे. (Reformative Justice).

तिसरी संकल्पना 'Distributive Justice' म्हणून आज बरेच वेळा बऱ्याच सभापरिषदांतून बोलली जाते. उद्योगधंद्यातल्या नफ्याचा भाग भांडवलाच्या मालकाचा किती व श्रमिकाचा किती? शेतात जे पिकते त्यातले शेतमालकाचे किती व शेतमजुराचे किती? समाजात निर्माण होणाऱ्या संपत्तीच्या उत्पादनात निरनिराळ्या घटकांचा भाग किती?

पहिल्या दोन संकल्पनांमध्ये जी समाजव्यवस्था (अर्थ व राजकीय व्यवस्थेसह) प्रचलित आहे ती बरोबरच आहे, असे गृहीत धरले जाते तर या तिसऱ्या संकल्पनेत या समाजव्यवस्थेतल्या उणिवा लक्षात घेतल्या जातात, घ्यायला हव्यात असे सांगितले जाते.

आणि या उणिवांचा विचार सुरू झाला की, चौथी संकल्पना जन्म घेते. ती Social Justice– सामाजिक न्यायाची. जमीन असणाऱ्याने शेवटपर्यंत मजूर म्हणूनच जगायचे का? स्त्रीने जन्मभर पुरुषाचे दास्य करायचे का? एखाद्या विशिष्ट गटाने–जातीने, एखादा विशिष्ट धंदाच पिढ्यान्‌पिढ्या करायचा का? हे आणि असे अनेक प्रश्न एखाद्या विशिष्ट व्यक्तीने एका विशिष्ट क्षणी केलेले कृत्य लक्षात घेऊन ठरविता येत नाहीत. त्याकरिता खूपच मोठा आवाका लागतो समाजाचा–त्यातल्या निरनिराळ्या घटकांचा भूतकाल, आपसातले संबंध, पूर्वी कसे होते, आता कसे आहेत (वर्तमानकाल) आणि पुढे कसे असायला हवेत (desirable future) याचेही ज्ञान सामाजिक न्यायाचा विचार करताना हवे असते.

एखाद्या वनवासीने (ज्यांना बरेच लोक आदिवासी म्हणतात) रानातली झाडे तोडली व विकली तर त्याचा हा गुन्हा, ज्या कॉन्ट्रॅक्टरने ती विकत घेतली त्याच्या गुन्ह्यापेक्षा लहान की मोठा? बरेच वेळा तो कॉन्ट्रॅक्टरच जंगल खात्याच्या अधिकाऱ्यांना पैसे चारून, तो वनवासी पकडला जाणार नाही हे पहातो–(जोपर्यंत तो कॉन्ट्रॅक्टरच्या दरात लाकडे पुरवतो तोपर्यंत) जर हा वनवासी कॉन्ट्रॅक्टरच्या म्हणण्याप्रमाणे वागला नाही, तर त्याला मारहाण होऊ शकते.समजा अशा काही प्रसंगांतून कॉन्ट्रॅक्टरचा वा जंगलखात्याच्या अधिकाऱ्याचाच खून झाला तर? लग्नात दारू पाजलीच पाहिजे व त्याकरिता पैसे हवे म्हणून काढलेले कर्ज, नवराबायकोंनी सावकाराकडे जन्मभर काम करूनही फिटत नाही. या ना त्या निमित्ताने काढलेल्या कर्जात जमिनी सावकाराकडे गहाण आणि जमीन ताब्यात असली तरी त्यातून पीक काढण्यासाठी करावे लागणारे

बर्डिंग, शेतीची औजारे, बीबियाणे–यासाठी लागणारा पैसा हातात नाही. म्हणून मग पुन्हा सावकाराकडेच मजुरी या दारिद्र्यातून, विषमतेतून, अज्ञानातून निर्माण झालेली भाडणे कशी सोडवायची? घडणारे गुन्हे कोणत्या तराजूने तोलायचे?

शासनाने निर्माण केलेली जी न्यायव्यवस्था आहे ती आधळी व तोंडाला पट्टा लावलेली. ती गरीब वनवासीनाच काय पण शहरातल्या शिक्षितानासुद्धा उपयोगाची नाही. शहाण्याने कोर्टाची पायरी चढू नये अशीच सर्वसाधारण समाजातली भावना. पोलिसाच्या बाबतीत तर ही भीती अधिकच. वनवासी भागात प्रस्थापित सत्तेचे (established order–व्यापारी, श्रीमत जमीनदार) पोलिस हे एक महत्त्वाचे साधन. ती सत्ता टिकविण्याचे तिला सोयीस्कर ती जुलूम–जबरदस्ती करण्याचे साधन. मग अर्थातच आधळी न्यायदेवता पोलिसाच्या रेकॉर्डबुकमधून आणि पटवलेल्या साक्षीदारांनी दिलेल्या माहितीवरून आपला माहितीपट तयार करणार. हुषार वकील महाशय (अधिक पैसेवाल्याचा अधिक हुषार) त्या माहितीत हवे तसे रंग ओतणार आणि या सर्व नाटकानतर निकाल दिला जाणार, आणि बऱ्याच वेळा हेही खूप दिवसानी–महिन्यानीच नव्हे तर वर्षांनी.

दिल्लीत आणि इतर अनेक शहरातून ही असली आधळी न्यायदेवता न्याय देऊ शकत नाही, हे लक्षात आले आहे Justice delayed is justice denied वगैरे सारखी वाक्ये मोठमोठे कायदेपडित, न्यायाधीश, राजकीय पुढाऱ्यांसारखीच अनेक सभा परिषदामध्ये लोकाच्या समोर फेकू लागले आहेत. पण पुढे काय?

जी न्यायव्यवस्था ब्रिटिशानी आपल्या देशात उभी केली व जी अजूनही आम्ही वापरतो आहोत (त्यातल्या काळ्या डगल्यासह) ती फक्त आणखी काही न्यायाधीश नेमून किंवा Legal Aid Societies काढून Distributive किंवा Social Justice देऊ शकेल का?

या प्रश्नाला एक उत्तर असे की प्रस्थापित राज्यपद्धती व न्यायपद्धती, समाजव्यवस्था बदलण्याच्या बाबतीत काहीच करू शकणार नाही. ती व्यवस्था तोडून मोडून काढण्यासाठी रक्तरंजित क्रांतीच करावी लागेल. त्यानंतरच नवी न्यायव्यवस्था जन्माला येईल युरोपातल्या फ्रान्सच्या क्रांतीचा व त्यानंतरच्या रशियन राज्य क्रांतीचा इतिहास ज्यानी वाचला आहे त्याना मात्र अशा क्रांतीची खात्री वाटत नाही. बरेच वेळा क्रांतीनंतर फक्त सत्ताबदल होतो–एका गटाकडून सत्ता दुसऱ्या गटाकडे जाते. हा नवीन गटही न्यायदेवता आधळीच राहील अशी दक्षता घेतो.

मग सहस्त्राक्षि, अनेक मुखी न्यायदेवता कशी जन्माला येईल? निश्चित मार्ग–एकच मार्ग दाखवणे कठीण आहे. पण अशी एक न्यायदेवता, बाल्यावस्थेतली का होईना, रगपूरला आली आहे.

## लोक अदालत

हे रंगपूर कुठे आहे? भारतातच. गुजराथेत. बडोदा जिल्ह्यात. श्री. हरिवल्लभ पारीख हा तरुण भारताला स्वातत्र्य मिळाल्यानतर (१९४९ च्या दरम्यान) छोटा उदेपूरच्या वनवासी भागात जाऊन राहिला. महात्मा गांधीच्या आशीर्वादाने (पण आदेशाने नव्हे) या वनवासी भागात त्याने काम करायचे ठरविले. त्यावेळची या भागातली परिस्थिती तीच–जी आजही अनेक वनवासी भागात आढळते. अर्धपोटी, जवळजवळ नग्नावस्थेत असलेले, मिळेल तेव्हा दारू पिणारे व इतरवेळी सावकाराकरता खपणारे, शेती कशी करायची ते माहीत नसलेले, १५ ऑगस्ट काय, किंवा २६ जानेवारी काय या तारखाचा नव्हे तर एकूणच दिनमानाचा, वर्तमान कालाचा किंवा भविष्यकालाचा ज्यांच्या जगण्याशी काहीही सबंध नाही असे वनवासी. याची वस्ती या छोटा उदेपूर व जवळच्या तालुक्यातून जवळजवळ ९५ टक्के त्याच्यात अर्थातच पुन्हा पोटजाती–त्याच्या भाषा वेगळ्या, धार्मिक समजुती वेगळ्या त्यावरूनही मग भाडणतटे, मारामाऱ्या. अर्थात आता हे चित्र पालटले आहे. या भागात वनवासी मडळी आता उत्तम शेती करू लागली आहेत अनेक लिफ्ट इरिगेशन सोसायट्या वनवासी मडळी चालवितात व त्यावर दोन दोन, तीन तीन पिके घेतात. वनवासीची घरे कौलारू झाली आहेत. शाळा तर आहेतच. रंगपूरला श्री. पारिखाचा जो आश्रम आहे त्याच्या भोवती असलेली जवळजवळ १०० गावे या ना त्या कार्यक्रमाच्या रूपात आश्रमाशी जोडली आहेत व या गावातला वनवासी आज माणूस म्हणून उभा राहतो आहे. याचा अर्थ सारे आबादीआबाद आहे असे नाही. सर्वोदयाचा मार्ग हा दशकाचाच नव्हे तर शतकाचा; पण वनवासी समाज आपल्या पायाने हा मार्ग चालू लागला आहे.

तर या भागात श्री हरिवल्लभजी पारीख–त्यांना भाई म्हणतात–१९४९ मध्ये जाऊन राहिले बरोबर त्यांची पत्नी पण त्यानी त्यावेळी जी अनेक कामे सुरू केली त्यापैकी एक काम वनवासीमधली भाडणे सोडवणे–नवराबायकोमधली, भावाभावामधली, बापमुलामधली. हळूहळू हा भाडणे सोडविण्याचा कार्यक्रम मोठा झाला. त्यात मग सावकाराच्या बरोबर झालेली भाडणे आली. पोलिस अधिकाऱ्याबरोबरची, जंगल अधिकाऱ्याबरोबरची भांडणे आली आणि आता तर बँकेबरोबर असलेली श्रीमंत, गरीब कर्जदाराची भाडणेही भाईजीच्या अंगणात सोडवली जातात. या अंगणाला ते म्हणतात, लोक अदालत–Open Court'–लोकाची न्यायसभा.

ही न्यायसभा कशी वाढली, तिच्यात आतापर्यंत किती खटले सोडवले गेले याची विस्तारपूर्वक माहिती ज्याना हवी असेल त्यानी डॉ उपेन्द्र बक्षी याच्या पुस्तकातून ती मिळवावी हे डॉ बक्षी स्वत. न्यायपंडित आहेत–सुरतला दक्षिण गुजराथ विश्वविद्यालयाचे उपकुलपती म्हणूनही त्यानी काम केले आहे (पुस्तकाचे नाव आहे 'From Takrar to Karar : Lok Adalat)

हा लेखात फक्त आपण ही न्यायसभा डोळसपणे काम करते म्हणजे कसे, तिची प्रक्रिया काय ते पाहू

कोणीही माणूस काही तक्रार घेऊन आला की त्याच्या बरोबर स्वत भाईजी व त्याच्या सहकाऱ्यापैकी कोणीतरी शांतपणे बोलते. त्याची तक्रार मग ती नवराबायकोतली असो नाहीतर सावकाराविरुद्ध असो समजून घेतली जाते समजून घेणे म्हणजे नुसती 'नोंद करणे' नव्हे तर त्याच्या त्या तक्रारीसंबधातल्या भावना, त्याच्या दृष्टीने त्या तक्रारीचा इतिहास, त्यामुळे निर्माण होणारे त्याचे प्रश्न ही सर्व माहिती त्याच्याकडूनच छोटेछोटे प्रश्न विचारून काढली जाते. कित्येक वेळी त्याला दुसरा दृष्टिकोन काय असू शकेल हेही सांगितले जाते. त्याला धमकावण्याकरिता नव्हे,

तर त्याला विचार करायला लावण्यासाठी. या अशा प्रसंगात कित्येक वेळी श्री. भाईजीही शिकत असतात.

एकदा काय झाले की, ४० एक वर्षाची एक वनवासी स्त्री भाईंच्या आश्रमात सकाळचीच आली. तिला भाईंनी विचारले की, काय काम आहे? तर ती बोलेनाच. मग दुपारी बाकीची मंडळी गेल्यावर ती भाईंना म्हणाली की तिला तिच्या नवऱ्याला सोडायचे आहे. भाईंनी तिला विचारले की तुझा नवरा तुला मारतो का? तर ती म्हणाली, नाही. मग भाई म्हणाले की, बाई ग तूही आता काही तरुण नाहीस. जरा समजुतीने घे. आता कुठे पुन्हा दुसरा नवरा शोधणार? त्या बाईने भाईंना विचारले की, तुझा बैल आजारी पडला, निकामी झाला आणि शेतीचा तर मोसम आला तर तू काय करतोस? दुसरा बैल घेतोस की त्या निकामी बैलालाच आजारतोस गोजारतोस? मग भाईजींच्या डोक्यात प्रकाश पडला. ब्राह्मणी समाजव्यवस्थेचे कायदे जसेच्या तसे या श्रमिक समाजव्यवस्थेला लागू करता येत नाहीत.

तर अशा या निरनिराळ्या तक्रारी समजावून घेऊन, नंतर त्या नोंद केल्या जातात. नतर ज्याच्याबद्दल तक्रार असेल त्याला एक आमंत्रण पत्र लिहिले जाते. 'समन्स' नव्हे, आमन्त्रणपत्र. या पत्रात त्या पक्षकाराला थोडक्यात त्याच्याविरुद्ध असलेल्या तक्रारीची माहिती दिली जाते व त्याला अमुक वेळी अमुक दिवशी न्याय सभेला हजर राहण्यासंबधी विनंती केली जाते. त्या पक्षकाराने आपल्याबरोबर त्याचे मित्र व नातेवाईक आणावेत असेही त्या पत्रात त्याला सुचविलेले असते. हे पत्र बहुधा तक्रार करणाऱ्या पक्षकाराबरोबरच त्या दुसऱ्या पक्षकाराकडे पाठवले जाते. जरूरच पडली तर ग्रामपचायतीच्या अधिकाऱ्यांची मदत घेतली जाते.

मग एखाद्या ठरलेल्या दिवशी न्यायसभा भरते. साधारणमानाने महिन्यातून एकदा किंवा दोनदा ही सभा भरते. उन्हं कलंडता कलंडता दुपारी ४ च्या मानाने ही सभा सुरू होते. आजूबाजूच्या गावचे तीनशे ते चारशे गावकरी उपस्थित असतात. अधिक दोन्ही पक्षकारांनी बोलावलेले त्यांचे मित्र, नातेवाईक, गावकरी. या न्यायसभेला भिंती नाहीत. वृक्षांच्या सावलीत एका मोकळ्या जागेत आश्रमाच्या परिसरातच ही सभा भरते.

### निर्णय घेण्याची पद्धत

भाईजी मध्ये बसतात. त्यांच्या दोन बाजूला दोन्ही पक्षकार, त्यांचे मित्र व नातेवाईक मडळी व या सर्वांच्या भोवती गावकरी. मग पक्षकार आपापली बाजू माडतात. वकील असा कोणीच नसतो. भाईजी मधूनमधून प्रश्न विचारतात. कोणीही गावकरी यावेळी प्रश्न विचारू शकतो वा इतर माहिती देऊ शकतो. त्या त्या समाजातल्या चालीरिती, सामाजिक अपेक्षा यापासून ते पक्षकाराच्या वैयक्तिक वागणुकीपर्यंत सारे विषय गावकऱ्याना बोलायला मोकळे असतात. ही सारी विचारांची व माहितीची देवघेव चालू असतानाच भाईजी नवीन माहिती वा नवीन दिशाही दाखवितात. जादूटोण्याबाबतच्या अनेक तक्रारी, त्या समजुती कशा चुकीच्या आहेत हे हळूहळू दाखवत, भाईजी सोडवतात. मग त्या बोलण्यात कुटुंबनियोजन येते, दिल्लीचे राजकारण येते, धर्मनीतीमत्तेचे आदर्श येतात. हे सारे लोकशिक्षणही तेथे चालू असते. व्याख्यानाच्या रूपाने नाही तर छोट्या छोट्या प्रश्नांतून, टिपणीवजा केलेल्या बोलण्यातून, उदाहरणातून व त्यातून निर्माण होणाऱ्या Alterntaive Scenarios मधून.

तर अशा या देवघेवीतून दोन्ही पक्षकार आपापली बाजू माडतात, दुसऱ्या पक्षकाराला समजून घेतात आणि स्वतःच्या प्रश्नाकडे दुसऱ्याच्या दृष्टीनेही बघायला लागतात. इथपर्यंत गाडी आली की, भाईजी सोप्या भाषेत दोन्ही बाजूंचे विवरण करतात व नंतर दोन्ही बाजू साराश रूपानेही मांडतात. (Summarization). त्यानंतर ते दोन्ही पक्षकारांना सांगतात की, त्यांनी त्यांच्या मित्रांतून दोन दोन पंच निवडावेत. या चार पंचांना भाईजी सांगतात की तुम्हाला जरी त्या विशिष्ट पक्षकाराने निवडले असले तरी तुम्ही आता त्या पक्षकाराचे नाही, तर तुम्ही या सपूर्ण न्यायसभेचे प्रतिनिधी आहात. तुम्ही आता या सगळ्या गोष्टीचा साकल्याने विचार करा व जो योग्य तो निर्णय द्या. मग हे पच बहुधा तास दीड तास जरा दूरच्या जागी जाऊन बसतात (आश्रमाच्या परिसरातच) व चर्चा करतात व त्याचे एकमत झाले की, परत न्यायसभेत येतात. तो वेळेपर्यंत न्यायसभा दुसरी एखादी केस ऐकत असते.

पंच मग त्यांचा निर्णय न्यायसभेला सागतात. त्यांच्यात जर आपापसात काही थोडे मतभेद असले, तर तेही न्यायसभेला सागितले जातात. मग पुन्हा त्यावर जरूर असली तर चर्चा होते. भाईजी पुन्हा विवरण करतात,

मार्ग दाखवितात व बहुतेक प्रसंगी दोन्ही पक्षकाराना मान्य होईल असा निर्णय घेतला जातो. क्वचितच प्रसंगी एखादी केस दुसऱ्या-त्यानंतरच्या न्यायसभेपर्यंत पुढे ढकलली जाते. बहुतेक निर्णय एकाच न्यायसभेत होतात.

तुम्ही विचाराल की, या निर्णयामागे शक्ती कोणती? saction कुठले? भाईजी म्हणजे काही सरकारने नेमलेला अधिकारी नाही. त्याचे स्वतःचे पोलीसदल वा इतर कोणतेही शस्त्रधारी दल नाही. जर एखाद्याने निर्णय मानला नाही तर?

भाईजींच्या मागे शक्ती आहे ती नैतिक, सामाजिक आणि 'openness'ची. दोन्ही पक्षकारांना माहीत असते की यातला कोणताही निर्णय भाईंनी स्वतःच्या स्वार्थासाठी किंवा आश्रमाच्या स्वार्थासाठी घेतलेला नाही. या सर्व न्यायालयाचा-पक्षकारांनी द्यावयाचा खर्च म्हणजे निर्णय झाल्यानतर सभेतल्या सर्वांना गूळ वाटायचा. याशिवाय इथं कोर्टाची फी, वकिलाची फी काहीच नाही. इथली नीतीमत्ता-तिचे आदर्श दिल्लीत किंवा पुण्यात मानले जातील किंवा न जातील; पण ते इथल्या पक्षकारांना समजणारे, त्यांच्या अनुभूतीतले असतात.

पण केवळ नैतिकशक्तीने हे न्याय अंमलात येत नाहीत हे खरेच. त्याकरता एक प्रचंड सामाजिक शक्तीही लागते. ज्यावेळी एखादा सावकार इथला निर्णय मानत नाही, त्यावेळी त्याच्यावर यशस्वी बहिष्कार टाकला जातो. जर एखादा अरण्य अधिकारी किंवा पोलीस ऑफिसर पैसे खात असेल, बलात्कार करीत असेल तर त्यावरही सामाजिक शक्ती आसूड उगारू शकते. असा आसूड दररोज उगारावा लागत नाही. गेल्या दहा-पधरा वर्षांत ही शक्ती चार-सहा

वेळाच प्रगट करावी लागली आहे आणि आता त्या शक्तीच्या अस्तित्वाच्या भयाने किंवा आदरानेच बरीचशी कामे सुलभ होतात.

'Openness' हाही एक फार मोठा विशेष या न्यायसभेचा आहे. इथली सगळीच 'documents', सगळाच वादविवाद सर्वांना खुला आहे. ही खरी आमसभा आहे. कोणताही गावकरी इथं बोलू शकतो. नव्हे तसे त्याला आवर्जून सांगितले जाते. या मोकळ्या खुल्या चर्चेतूनच लोकशिक्षण घडत असते. या लोकशिक्षणातून तयार होत असलेला जागृत वनवासी–त्याचे ते जागेपण, त्याचे ते माणूसपण ही तिसरी शक्ती या न्यायसभेच्या पाठीमागे आहे.

तर अशी ही शक्तिशाली न्यायदेवता, सहस्राक्षी. अनेक मुखांनी बोलणारी, समजून घेणारी, दोन्ही पक्षकारांना मुलासारखी मानून त्यांना जवळ आणणारी.

हे सारे घडते आहे–हे कल्पनारंजन नाही आणि हे सारे घडते आहे, याच भारतात एका खेड्यात. इथले नेते अमेरिकेत इंग्लंडमध्ये शिकलेले नाहीत. परदेशातले काही लोक आता तिथं हे विलक्षण दृश्य पहायला येतात; पण ही 'लोक अदालत' कोणत्याही परदेशी पाठ्यपुस्तकावर आधारित नाही. ती आधारली असलीच तर वनवासींच्याच जुन्या पद्धतीवर, भिल्ल मंडळीत जमातीने एकत्र येऊन निर्णय घेण्याची पद्धत आहे. पूर्वीच्या काही ग्रामपंचायतीत (कोकणातल्या खोतीगावातूनही) गावातल्या प्रमुखांसमोर (पाचामुखी परमेश्वर मानून) तक्रारी मांडून, त्या सोडविण्याची पद्धत होती; पण या पद्धती त्यातल्या काही प्रमुखांनी स्वतःच्या बटीक बनवल्या व त्यातल्या सामाजिक न्यायाचा आशय नाहीसा केला; पण हा सामाजिक न्यायाचा आशय L. L. M. ची पदवी घेऊन किंवा बॅरिस्टर बनून समजतो का? किंवा समजला तरी तो जोपासण्याचे धैर्य येते का?

त्याकरिता तळागाळातल्याच प्रत्येक व्यक्तीला तो आशय समजेल असे लोकशिक्षण मिळायला हवे. हे लोकशिक्षणाचे काम रंगपूरचा आश्रम गेली तीन तपे करतो आहे. त्यातून ही डोळस न्यायदेवता जन्मली आहे. श्री. भाईजींच्या नंतर हे लोकशिक्षणाचे काम चालेल का? सांगता येणार नाही; पण हे लोकशिक्षणाचे काम, सर्वोदयाचे काम केवळ भाईजींचे थोडेच आहे? भाईजी काही वकील नाहीत, रूढार्थाने मॅट्रीकही नाही. गांधींच्या वर्ध्याच्या आश्रम शाळेत शिकलेला हा तरुण. त्याने ही न्यायव्यवस्था गांधींच्या मृत्यूनंतर सुरू केली, जोपासली, वाढवली. असे तरुण भारतात यानंतर जन्मणारच नाहीत का?

'ग्रामायन' च्या कार्यकर्त्यांनी हीही चळवळ समजावून घ्यावी व महाराष्ट्रात त्या स्वरूपाचे काही काम उभारता येते का पहावे एवढाच या लेखाचा उद्देश आहे. या बाबत अधिक माहिती हवी असल्यास खालील पत्त्यावर लिहावे/भेटावे.

पत्ता : श्री. हरीवल्लभ पारिख,
रंगपूर आश्रम, पोस्ट रंगपूर (कवाट)
जि. बडोदा ३९१ १४० (गुजराथ)

ज्या काही केसेस वरच्या कोर्टातच लढवाव्या लागतात. त्याकरिता एक Legal Support Scheme ही तयार झाली आहे. त्याचीही माहिती वरील पत्त्यावर मिळेल.






## मराठ्यांच्या सांस्कृतिक इतिहासाचा कॅलिडोस्कोप

'शिवाजी अँड दि फॅसेटस् ऑफ मराठा कल्चर' हे शरयू दोशी संपादित राजबिंडे पुस्तक अनेक दृष्टीने अपूर्व आहे. मराठ्यांच्या सामाजिक व सास्कृतिक जडणघडणीची परिपूर्ण कल्पना देणारा हा इंग्रजीतील ग्रंथराज नाविन्यपूर्ण असून तो नवागतांचे व जाणकारांचे सारखेच समाधान करणारा आहे.

राजकीय बाबींवर कमी भर देऊन सांस्कृतिक कलात्मक विषयांना जादा महत्त्व देण्याचे धोरण संपादकांनी अगोदरच ठरविलेलं असल्यामुळे हा ग्रंथ मराठी संस्कृतीची इंग्रजी गाथा ठरेल. इतिहासाच्या अत्याधुनिक शास्त्र-मूल्य कल्पनांनुसार मानवी संस्कृतीच्या कला, धर्म, समाज, अर्थ, साहित्य इत्यादी अंगांवर अधिक भर दिला जातो. जुन्या इतिहासाचे नायक राजे, बादशहा, सम्राट, सरदार–दरकदार ही मंडळी होती; तर आधुनिक इतिहासात सामान्य माणूस हा मध्यवर्ती बिंदू कल्पिलेला आहे. ह्या पुस्तकाचे नाव जरी 'शिवाजी' ह्या शब्दाने सुरू होत असले तरी हे शिवचरित्र नाही. 'शिवाजी' नावाने सुरुवात केली तर ग्रंथाला अधिक 'उठाव' मिळेल असा व्यवहारी हिशोब प्रकाशकांचा असावा. तरीही मराठ्यांच्या राजकीय इतिहासाचा धावता आढावा घेणारे लेख प्रस्तुत ग्रंथात समाविष्ट आहे. डॉ. अ. रा. कुलकर्णी व श्री. सेतुमाधवराव पगडीचे राजकीय लेख आटोपशीर असून मराठ्यांच्या राजकीय प्रगती–परागतीचे सम्यक दर्शन घडविणारे आहेत.

आधुनिक महाराष्ट्राला मध्ययुगात आजचा तोंडावळा प्राप्त झाला असे मानले जाते. न्या. रानड्यांनी प्रतिपादन केल्याप्रमाणे महाराष्ट्र देशाची निर्मिती वणवा पेटल्याप्रमाणे झाली. परकीयांच्या अत्याचारामुळे पेटून उठलेल्या मराठी माणसांच्या धुमसत्या असंतोषाला शिवाजीने वत्ती दिली आणि महाराष्ट्राच्या रूपाने एक राजकीय शक्ती उदयास आली. रजपूत, शीख वगळता बाकी सर्व जमाती आणि प्रांत, पारतंत्र्यात खितपत पडलेले असताना महाराष्ट्र स्वराज्याची दुर्मिळ फळे चाखीत होता. ह्या रांगड्या लोकांच्या महाराष्ट्र देशाने दोन शतकांपर्यंत हिंदुस्थानात घुसलेल्या व घुसू पहाणाऱ्या परकीय शक्तीना कडवा प्रतिकार केला. छत्रपती शिवाजीने ह्या हिंदवी स्वराज्याची निर्मिती केली व शिवाजीच्या राजकीय कार्याला योग्य ती सांस्कृतिक व धार्मिक पार्श्वभूमी महाराष्ट्रातील साधुसंतांनी तयार केली. महाराष्ट्र देशाच्या निर्मितीत मराठी संतांचे योगदान कधीही विसरता येणार नाही. कर्मकांड व जातिभेद नसलेल्या वारकरी संप्रदायाने धर्माचे लोकशाहीकरण घडवून आणले व सामान्यांच्या उंबरठ्यापर्यंत धर्म नेऊन पोहोचविला. डॉ यु. म. पठाण, श्री. शं. ग. तुळपुळे व श्री. अलमाडी ह्यांनी अध्यात्मातील त्या लोकोत्तर प्रेरणांचा

आढावा आपल्या लेखात घेतलेला आहे.

कल्याणपासून ते मद्रासजवळील जिंजीपर्यंत संपूर्ण दक्षिण भारतात किल्ल्याच्या तीन रांगाची योजनाबद्ध आखणी करून मराठ्यानी महाराष्ट्राला परकीयाच्या अनेक धाडींतून वाचविले. किल्ल्याची ही अपूर्व योजना मराठ्याच्या दूरदर्शित्वाचे जसे द्योतक आहे, तसेच ती त्यांच्या उच्च प्रतीच्या संरक्षणशास्त्राचा पण पुरावा आहे. मराठेकालीन किल्ल्याची वैशिष्टये,प्रकार व महत्त्व डॉ. प्र. न. देशपांड्यानी आपल्या लेखात सांगितले आहे.

आरमारी शक्तीचे महत्त्व ओळखणारा छत्रपती शिवाजी हा भारताच्या इतिहासातील पहिला व शेवटचा राजा मानला पाहिजे. कोकणातील वनसपत्तीचा जहाजबांधणीसाठी आणि तेथील बंदरांचा आरमारी संरक्षणासाठी वापर करण्यात शिवाजीने श्रेष्ठ प्रकारची योजकता दाखविली. दुर्दैवाने त्याचे हे दूरदर्शित्व त्याच्याबरोबरच संपले. नंतरच्या वारसदारानी आपल्या वैयक्तिक प्रतिष्ठेसाठी शत्रूशी घरोबा करून आपलेच आरमार नष्ट करून टाकले. इंग्रज व पोर्तुगीजाना भारत ही खंडप्राय वसाहत अशा रीतीने खुली करून दिली गेली.

### प्रादेशिक समतोल

बहुचर्चित 'भवानी तलवारी'ची ऐतिहासिक माहिती डॉ पी एम्. जोशीनी साधार दिली आहे ही तलवार भारताबाहेर कधी गेलीच नाही, असा त्याचा दावा आहे. लंडनच्या शाही वस्तुसंग्रहालयात ह्या तलवारीची व्यर्थ शोधाशोध करणाऱ्यानी ह्या लेखातून योग्य तो बोध घ्यावा.

मोगली स्थापत्याशी मराठेकालीन स्थापत्याची तुलना करण्याचा मोह अनेक इतिहासकारांना होतो; पण ही तुलना सर्वस्वी अयोग्य आहे. कारण मोगलाचे राज्य हिंदुस्थानच्या भूमीत चांगले स्थिरावल्यानंतर भव्य व कलापूर्ण इमारती शहाजहानने बांधल्या तशी शांतता व स्थैर्य मराठ्यांना कधीच लाभले नाही. मोगल, विजापूरकर व इंग्रजाशी त्याना सतत लढावे लागले. ताजमहालसारख्या कलाकृती बांधण्यासाठी उसंत आणि पैसा लागतो; पण पैसा व ही फुरसत शेवटपर्यंत न मिळाल्यामुळे ताजमहाल, दिवाण-इ-आम व दिवाण-इ-खास अशा रमणीय इमारती ते उभ्या करू शकले नाहीत. ह्या पुस्तकात मराठ्यांच्या स्थापत्यकलेचा आढावा घेणारे अनेक लेख आहेत. श्री. ग. ह. खऱ्यांचे वाडे व गढी ह्या विषयावरील सचित्र लेख शास्त्रोक्त दृष्टिकोनातून लिहिले आहेत. वाड्याची दारे, खिडक्या, हौद, चोर दरवाजे, दालने ही बारीकमारीक वैशिष्ट्ये खऱ्याच्या ह्या क्षेत्रातील प्रचंड व्यासंगाची साक्ष देतात नागपूर व पैठणच्या वाडे व मंदिरशैलीची माहिती देणारे दोन लेख पुस्तकात समाविष्ट करून सपादकानी प्रादेशिक समतोल तर साधला आहेच; पण त्याचबरोबर मुस्लिम व उत्तर भारतीय संस्कृती व शैलीचे मराठी स्थापत्यावर कोणते परिणाम झाले, हे अभ्यासण्याच्या दृष्टीनेही हा भाग उपयुक्त आहे.

मराठी चित्रकला मध्ययुगीन काळातील सकेतानुसार धर्माच्या माध्यमातून प्रगट झाली मराठी चित्रकलेची वैशिष्ट्ये व तिच्या मर्यादा दाखवणारे चार लेख पुस्तकात समाविष्ट केले आहेत. भिंती चित्रे आणि काच चित्रे ह्यासारख्या अनोख्या क्षेत्रातही मराठ्यानी मुलुखगिरी केलेली आपणास दिसते.

महाराष्ट्रातील वेशभूषा आणि दागदागिने ह्यासबधीची चिरपरिचित माहिती शरयू दोशीनी आपल्या शैलीदार इंग्रजीत दिली आहे आर. नागस्वामीचा तंजावरच्या मराठ्यावरच्या लेखाचा इथे आवर्जून उल्लेख करणे आवश्यक आहे. मराठ्यांच्या इतिहासाचा विचार करताना आपण बृहत्तर महाराष्ट्राचा फारसा विचार करीत नाही महाराष्ट्रीय संस्कृती सुदूर दक्षिणेपर्यंत ज्यानी नेऊन पोहोचविली व मराठी कलेची विविध दालने तेथे ज्यानी खोलली व आजतागायत टिकवून धरली, त्याचे स्मरण आपल्याला क्वचितच होते. महाराष्ट्रातील मराठ्यांशी वैर करणारे पण मुसलमानाशी निष्ठावंत रहाणारे हे तंजावरचे मराठे महाराष्ट्रातील मराठ्यापेक्षा जास्त रसिक आणि कलाप्रेमी होते तंजावरचा एक मराठी राजा-शहाजी-ह्याने संस्कृत, मराठी, तेलगु, पर्शियन आणि हिंदी भाषेत तीस लहान-मोठे ग्रंथ लिहिले. मराठ्याच्या संपूर्ण इतिहासात इतका बहुश्रुत व बहुभाषिक राजा झालेला नाही

### उत्तम निर्मिती

संपूर्ण पुस्तकाची छपाई गुळगुळीत आर्ट पेपरवर करून व आत रंगीबेरंगी चित्रे-नकाशे देऊन मार्ग प्रकाशनने अभ्यासकांच्या डोळ्याना मोठी मेजवानी दिली आहे ह्या ग्रंथात सत्तावीस नामवंत व्यक्तींचे असलेले लेख हा खरोखरी दैवदुर्लभ योग आहे प्रस्तुतच्या भव्य पुस्तकाचे आयोजन श्री. अण्णासाहेब पत, डॉ पी एम्. जोशी, श्री.ग ह खरे, श्री. बाबासाहेब पुरंदरे, श्री. गो. नी. दांडेकर आणि डॉ. अ. रा. कुलकर्णी ह्यांनी केले आहे शीख, राजपूत व मोगलांच्या सांस्कृतिक इतिहासावर अनेक ग्रंथ उपलब्ध आहेत; पण मराठ्याच्या सस्कृतीची यथातथ्य कल्पना देणारा एकही दर्जेदार ग्रंथ उपलब्ध नव्हता. ती उणीव ह्या देखण्या पुस्तकाने भरून काढली आहे.

—प्रा. ह. म. घोडके

शिवाजी अँड दि फॅसेटस् ऑफ मराठा कल्चर
संपादिका शरयू दोशी
मार्ग पब्लिकेशन्स.
पृष्ठे : २२५, मूल्य : रु २०५.

---

# गावकुसाबाहेरचे बालपण

---

एखादा चेहरा पहाताक्षणीच मनात भरतो. तो चेहरा जर का एखाद्या सौंदर्यवतीचा असेल तर नवल नाही; पण तो जर एखाद्या महाराचा असला तर नक्कीच आश्चर्य वाटतं आणि मी म्हणतोय तो चेहरा जिता जागता नाही, तर एका पुस्तकाच्या मुखपृष्ठावरील ''नामिक दलिताचा आहे ! किती विलक्षण गोष्ट आहे, नाही ?

ही किमया सुभाष अवचटांची ! कपाळावर नापसतीची आठी, डोळ्यात दुखावलेला भाव आणि शब्दाना बांध घालणारे ओठ. मोनालिसाच्या तोडीच्या या चित्राचं नाव ठेवावं 'रम्या म्हार.'

'आमचा बा रम्या म्हार' या वाक्यानं रुस्तुम अचलखांबाच्या 'गावकी'ची सुरुवात

होते आणि पुस्तकाचा शेवट होतो 'बा'च्या मृत्यूनं; पण हे रंभ्या म्हाराचं चरित्र नाही. हे लेखकाचं आत्मचरित्रही नाही. बालपणातल्या कडु-गोड आठवणींचं हे आत्मकथन आहे. यु. म. पठाणांच्या आग्रहामुळं या आत्मकथनाचं वाचन लेखकानं मराठवाडा विद्यापीठाच्या मराठी विभागात केलं आणि श्रोत्यांचा प्रतिसाद इतका जबरदस्त आला की त्याच्या रेट्यानंच ते पुढं सरकलं.

'गावकीचं वैशिष्ट्य हे की, इतर दलित साहित्यातील भडक विद्रोहामुळं सवर्ण वाचकांच्या मनात जो कडवटपणा येतो, तसा इथं येत नाही. लेखकाच्या मनात प्रक्षोभ असूनही इथं वाचकांच्या मनात उत्पन्न होते ती निखळ सहानुभूति. लेखकानं पुस्तकाच्या आरंभी 'मनोगता'त म्हटलंय की, 'महार-मांगांचा छळ, पिळवणूक, समाजानं लादलेलं लांच्छनास्पद जिणं मी डोळ्यानं बघितलंय. त्याचे चटके अजून माझ्या देहाची लाही करतात. हे दुःख, हा प्रक्षोभ कुठंतरी वेशीवर टांगलाच पाहिजे; पण प्रत्यक्षात झालंय असं की या प्रक्षोभानं पुस्तकात अक्राळ विक्राळ विद्रोहाचं रूप धारण केलेलं नाही, तो सवर्णाविषयीच्या घृणेत रूपांतरित झालेला नाही, उलट, वैषम्यातून निर्माण होणाऱ्या करुणेचा मृदु चेहरा त्या प्रक्षोभानं घेतला आहे. इथं सवर्णांविषयी दुरावा आहे; पण द्वेष नाही.

रुस्तुम अचलखांब हे नाट्यशास्त्राचे प्राध्यापक आहेत. त्यामुळंच की काय, प्रस्तुत आत्मकथनात नाट्यमय तेवढेच प्रसंग त्यांनी निवडले आहेत. लहानपणी चुलतभावाबरोबर आपण गुपचूप दारू कशी हाणली, अन् मग आपलं विमान कसं वर चढलं, त्या वयात कुणब्याच्या एका पोरीनं आपल्याला कसं वेडं केलं, रात्री वावरात चोरी करताना आपण कसा वेदम मार खाल्ला, एका लग्नाची वरात गावावाहेरून न नेता गावातूनच न्यायचा आग्रह दलितांनी धरल्यामुळं कसा समरप्रसंग उद्भवला, इत्यादि नाट्यपूर्ण घटना लेखकानं जिवंत केल्या आहेत.

हे प्रसंग रंगवताना लेखकानं महार-मांगांच्या बोलीभाषेचाच सर्वत्र वापर केला आहे. ही भाषा ओबड-धोबड आणि रोख-ठोक आहे. तिच्यात वेचक शेलक्या शिव्या आहेत; परंतु स्त्री जशी खालच्या जमातीतली असली, रांगडी असली, तरी मर्यादशील असते, तशी या भाषेनंही कुठं मर्यादा सोडलेली नाही. ती अश्लील वाटत नाही, बीभत्स वाटत नाही.

लेखकानं जी काही व्यक्तीचित्रे रंगवली आहेत त्यापैकी स्वतःच्या बापाचं वर्णन लाजवाब आहे. लेखक तालुक्याच्या गावी राहून शिकतोय. 'बा' त्याला भेटायला आलाय. सईनची मळकट बाराबंदी, धोतराचे ओचे गुडघ्यापस्तोर खोचलेले, डोक्यावर लाल रंगाचे पागोटं, हातात कानापस्तोर लांब असलेली काठी, अन् धुळीनं कायमचे माखलेले पाय...शाळा सुटस्तोवर बा मैदानातल्या झाडाखाली वसून ऱ्हायचा. शाळा सुटली की म्या धावत बा जवळ जायचो. तो मह्या अंगाखांद्यावरून हात फिरवायचा. मग आमी नळावर जायचो, मायनं बांधून दिलेले धापाटे खायचो. बा पुन्हा मला शाळापस्तोर सोडायचा. फाटकात थांबायचा पागोट्याची गाठ सोडायचा अन् त्यातले आठ आणे मह्या हातावर ठेवायचा...आता बाचं ध्यान झालं की हे रूप, कसं सरकन् डोळ्यांम्होरं उभं ऱ्हातं!'

'बा' विषयी लिहिताना लेखकाची लेखणी अत्यंत हळुवार होते. 'म्या चार बूकं शिकून मोठा झालोय ना, त्यो मह्या बा मुळंच.' लक्षात घ्यायची गोष्ट-लेखक आपलं नाव सर्वत्र 'प्रा. रुस्तुम अचलखांब' असं लावतो; पण 'मनोगता'च्या शेवटी 'रुस्तुम रंभाजी अचलखांब' असं नाव लिहिणं त्यानं पसंत केलंय. वडिलांविषयीची सारी कृतज्ञता त्यात प्रगटली आहे.

केशव मेश्राम यांनी 'अतिशय गुणी, वेधक आणि प्रांजळ कलाकृती' या शब्दात 'गावकी'चा गौरव केलाय. यापेक्षा चांगली दाद कोणती असणार?

—सुरेश परांजपे

गावकी<br>
प्रा. रुस्तुम अचलखांब<br>
श्री विद्या प्रकाशन<br>
पृष्ठे : ८०,<br>
किंमत : रु. २०।-

# शब्दांचं अंगण

आशा कर्दळे

## पाकशास्त्र-आहारशास्त्र

**मा**णसाची जीभ! किती छोटासा अवयव! पण रोजच्या व्यवहारात सर्वात जास्त वाटा तिचाच असावा. बोलणं आणि खाणं ही दोन कामं निसर्गानं तिला दिली. त्या कामांची अंमलबजावणी ती किती त्वरेने करते. 'अन्न हे पूर्णब्रह्म आणि उदरभर नोहे जाणिजे यज्ञकर्म' वगैरे वचनं बाजूला ठेवून ती आपले लाड पुरवून घेते. अन्नपूर्णेच्या साक्षीनं घरात रांधलेला रूचकर स्वयंपाक असो की अलिशान हॉटेल्समधून आकर्षकरीत्या पेश केलेले चमचमीत पदार्थ असो, त्यामागे या बोटभर अवयवाचंच अधिराज्य दिसतं. माणसाला खाण्याचा किती सोस! त्यासाठी हजारो नव्हे, लाखो पदार्थ त्यानं शोधून काढले. निरनिराळे रूचीबंध तयार केले. त्यातून नवीन-नवीन पाककृती जन्माला येऊ लागल्या सुगरणी आपले कौशल्य पणाला लावून खाणाऱ्याला तृप्त करू लागल्या. आपल्या पतीच्या हृदयात शिरण्याचा मार्ग त्याच्या जिभेवरून जातो हे कळल्यावर तर नवपरिणित वधूंना आपल्या आईकडून किंवा सासूकडून पाककृती शिकण्यात आनंद वाटू लागला. शिक्षण आणि नोकरीच्या निमित्तानं स्त्रिया स्वयंपाकघरापासून काही काळ दूर जाऊन त्यापेक्षा वेगानं जवळ येऊ लागल्या. कारण आहाराचा शास्त्र म्हणून त्यांनी अभ्यास सुरू केला. पेशव्यांच्या काळातल्या मुदपाकखान्यात तयार झालेल्या शाही श्रीखंड-बासुंदीपासून आजच्या चिनी पदार्थांपर्यंतचा हा प्रवास मोठा मजेदार आहे.

खरं म्हणजे स्वयंपाक ही स्त्रियांची मक्तेदारी मुळीच नाही. कोणत्याही मंगल कार्यातला सुग्रास स्वयंपाक किंवा हॉटेलमधल्या

'डेलिशस डिशेस' पुरुषच तयार करतात. पण पाकशास्त्रावरची सर्व पुस्तकं मात्र स्त्रियांनीच लिहिली आहेत. पुरुषाने लिहिलेल पाककृतीचं पुस्तक स्वागतार्ह ठरावं !

आपल्या अनुभवातून सिद्ध केलेल्या पाकक्रिया सर्वात प्रथम पुस्तकरूपान दिल्या, त्या सौ. लक्ष्मीबाई धुरंधर यांनी. त्यांचा जन्म १८८१ मधला आणि मृत्यू १९४६ मध्ये. १९१० मध्ये त्यांचं 'गृहिणीमित्र अथवा हजार पाकक्रिया' हे पुस्तक प्रसिद्ध झालं. सत्तर वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालेल्या या पुस्तकानं खूप लोकप्रियता मिळवली. त्याच्या १६ आवृत्या निघाल्या. १७ वी आवृत्ती १९८२ मध्ये मॅजेस्टिकन काढली. जुन्या पिढीतल्या गृहिणींनी या ग्रंथाला स्वयंपाकघरात मानाची जागा दिली. आज जे स्थान 'रुचिरा'ला मिळाल आहे, तेच त्याकाळी 'हजार पाकक्रिया'ला मिळालं.

## रुचिरा–अन्नपूर्णा

या पुस्तकाचं वैशिष्टय असं की, पदार्थ सजवण्याची आणि आजारी माणसांसाठी वेगळया पदार्थकृती देण्याची उत्कृष्ट जाण लेखिकेला दिसते. वजनं आणि मापं ग्रॅम आणि टीस्पून–टेबलस्पूनमध्ये आहेत. मास्याहार, मांसाहार आणि शाकाहार अशा तीन भागात पाककृती विभागलेल्या आहेत.

काळाबरोबर खाण्याच्या सवयी बदलल्या त्या काळी, मुबलकता आणि सुबत्ता होती. घृतकल्या मधुकल्या हल्ली जमणार नाही आणि शास्त्रालाही ते मान्य नाही. त्यामुळे यातले काही वैभवी, श्रीमती पदार्थ आपोआपच मागे पडत जातील. मूळ लेखिकाच्या नातसुनेने, सौ सुधा गोरक्षकर यानी नवीन आवृत्तीचं हस्तलिखित तयार केलं पण जुन्यातल्या काही चूका तशाच राहून गेलेल्या दिसतात. बरेचदा 'साहित्यात' दिलेल्या वस्तूचा 'कृतीत' वापर नाही किंवा दिलेल्या प्रमाणाने पदार्थ विघडतो अशी तक्रार काही गृहिणींची आहे.

पाकशास्त्रावरची अनेक पुस्तक आली आणि येतील पण 'रुचिरा'सारखी अफाट लोकप्रियता दुसऱ्या ग्रथाला मिळाली नाही. कमलाबाई ओगले यांचा हा ग्रथ स्त्रीसखी प्रकाशननं काढला. त्याची १८ वी आवृत्ती जून ८४ मध्ये निघाली. लाखाच्या वर खपाचा आकडा त्यानं गाठला. कमलाबाई ओगले यानी आपल्या सासूबाईंकडून चवदार पदार्थ तयार करण्याचे अनुभवी धडे मिळवले प्रत्येक आवृत्तीत काही पदार्थांची भर नव्यानं पडली असली,तरी पुस्तकाचं स्वरुप तेच आहे. न्याहारी, जेवण, मधल्या वेळेच खाणं अशा विभागात यातील पदार्थ विभागले आहेत या पुस्तकाचं आकर्षण म्हणजे पदार्थांची रगीत आणि श्वेतश्यामल छायाचित्रं. ती या पुस्तकात प्रथम आली. मापे अगदी सोपी वाटी–चमचाची असून संसारोपयोगी सूचना हे उपयुक्त परिशिष्ट पुस्तकाला जोडलं आहे. गुजराथी, बगाली, पंजाबी. मद्रासी अशा पदार्थांचे वेगळे विभाग केले आहेत. यातील गोड पदार्थांचा एकच दोष जाणवला आणि तो असा की, यात दिलेल्या प्रमाणानुसार साखर घातली, तर पदार्थ फार गोड होतो.

सौ. मगला बर्वे याच्या 'अन्नपूर्णा' या ग्रंथाचाही आवर्जून उल्लेख करावा लागेल. त्याचं हे पहिलं पुस्तक. पण आज मंगला बर्वे यांच्या नावावर सर्वात जास्त पुस्तकं जमा आहेत. १) न्याहारी व उपहार, २) चायनीज पदार्थ, ३) मासाहारी इच्छाभोजन आणि ४) फ्रीज ओव्हन आणि मिक्सर अशी इतर चार पुस्तकं त्यांनी लिहिली. नव्या नव्या पदार्थांचा शोध लावण्याची त्यांची प्रवृत्ती दिसते. 'फ्रीज, ओव्हन आणि मिक्सर' यात त्यानी आधुनिक साधनाच्या मदतीनं तयार होणारे पदार्थ दिले आहेत. मगलाबाईंच्या मते स्वयंपाकघर ही एक प्रयोगशाळा आहे आणि त्यातून षड्रसांचा अविष्कार करायचा असतो जुन्या आणि नव्या पदार्थांचा आणि ते तयार करण्याच्या पद्धतीचा त्यांनी मेळ साधला आहे. पदार्थ स्वादिष्ट असावा, तो आकर्षक दिसावा आणि त्यातली जीवनसत्त्वेही टिकून रहावीत याला त्यांनी महत्व दिले आहे.

'अन्नपूर्णा'च वैशिष्टय हे की, भाज्या, पालेभाज्या, डाळी–कडधान्ये याचे स्वतत्र विभाग केलेले आहेत. त्यामुळे सगळया तऱ्हेच्या आणि एखाद्या भाजीचे दहा/दहा प्रकार त्यात आढळतात करी हा लेखिकेचा खास हातखडा. पपई करी, फणसाची करी, सिंधी बेसन करी हे पदार्थ उत्कृष्ट. त्याशिवाय सूप्स, सलेड्स, चटण्या (देशी आणि पाश्चात्य) हे विभाग उल्लेखनीय वाटतात.

स्वाती प्रकाशनच सौ. इंद्रायणी सावकार यानी लिहिलेल 'रसवती' हे पुस्तक अनेक नवीन पदार्थांची ओळख करून देतं. घरात असलेल्या पदार्थांपासून कोणते पदार्थ तयार करता येतात, त्याची उपयुक्त यादी दिलेली आहे. यात अनेक आधुनिक पदार्थांचा समावेश आहे. विशेषतः सगळया तऱ्हेचे सॉस, जॅम्स, पुडिंग, कस्टर्ड, मार्मालेड कसे करायचे ते सांगितल आहे. आंबरसातल्या पोळया, सफरचंदाच्या पोळया, रायआवळयाची जेली गुळाचा सॉस, चीज बॉल्स या पदार्थांचा आवर्जून उल्लेख करावा लागेल.

मासाहारासबधी दोन ग्रंथ आहेत. एक मगला बर्वे याचा 'मासाहारी इच्छाभोजन' आणि दुसरा शालिनी नाडकर्णी यांचा 'सामिष आहार'. त्यापैकी पहिलं मॅजेस्टिकचं तर दुसरं स्वाती प्रकाशनचं आहे. शाकाहाराकडून मासाहाराकडे वळताना साधारणपणे लोक अंडी, चिकन, मटण, खिमा मासळी या क्रमान वळतात. तसेच पाव विभाग मगला बर्वे यांनी आपल्या पुस्तकात केले आहेत. शालिनी नाडकर्णी याच्या पुस्तकात पाश्चात्य पदार्थ बरेच आहेत. फ्रेंच, रशियन, अमेरिकन, इटॅलियन वगैरे देशाच्या प्रसिद्ध पाककृती प्रकर्षानं हजेरी लावतात.

हल्ली चायनीज फूडची क्रेझ वाढत चालली आहे. सबध जगात ते एक आवडतं जेवण झालं आहे. चिनी हॉटेलात जेवण घेणं ही फॅशनही झाली आहे. अर्थात काहीना ते फार आवडतं तर काहीना मिळमिळीत वाटत. मॅगी टू मिनिट्स नूडल्सच्या रूपानं हा झटपट पदार्थ घरोघर पोहोचला आणि लोकप्रियही झाला इतर पद्धतीपेक्षा चिनी पदार्थांची कूकिंग मेथड वेगळी आहे. पदार्थातील सत्त्व तसच राहण्यासाठी कमी शिजवणं आणि वाफवण यावर या पद्धतीत भर असतो. सूप हा चिनी आहारातला महत्त्वाचा घटक. तसच निरनिराळया तऱ्हेचे सॉस हवेत. आहारशास्त्राच्या दृष्टीनं चायनीज फूड चांगलं.

•

## आहार हे शास्त्र

या चिनी पदार्थांवरची दोन पुस्तकं आहेत. एक सौ. वसुमती धुरू यांचं 'चिंगलान–चायनीज कुकरी' हे रोहन प्रकाशनच पुस्तक. डॉ कोटणीस याच्या पत्नीचं नाव त्यानी

पुस्तकाला दिलं आहे. लेखिकेनं या पुस्तकात लोकप्रिय चिनी पदार्थकृती दिल्या आहेत. चविष्ट आणि करायला महाग नाही अशा पदार्थांची निवड केली आहे. प्रथिनांची शरीराला फार गरज असते म्हणून लेखिकेनं समतोल आहाराला आवश्यक आणि सोयाबीन, मूग, शेंगदाणे, तीळ अशा भरपूर प्रथिनं असलेल्या वस्तूंपासून तयार होणारे पदार्थ दिले आहेत. चिनी पदार्थांमध्ये अजिनोमोटोचा अतिरिक्त वापर असतो. तज्ज्ञांच्या मते त्यामुळे कॅन्सर, चक्कर येणे वगैरे विकार होतात. त्यामुळे अजिनोमोटो टाळून पदार्थ तयार कसे करायचे ते सांगितलं आहे. लेखिकेच्या मते चिनी आहाराचा एक दोष म्हणजे दूध दुभतं त्यात नसतंच. लेखिकेने दूध, पनीर, दही घालून छान पदार्थकृती दिल्या आहेत. थोडक्यात, शुद्ध चिनी पदार्थांचं चांगलं भारतीयीकरण केलं आहे.

खाण्याचे पदार्थ देशधर्मांच्या तटबंदी मोडून काढतात. अमेरिकन हॅंबर्गर, हॉटडॉग, पिझ्झा, स्पॅगेटी हे पदार्थ आपण चवीनं स्वीकारले. उडपी पदार्थ देशभराच्या आहारात मानाचं स्थान मिळवून बसले. उडपी, पंजाबी हॉटेल्स देशाच्या कानाकोपऱ्यात पसरली आहे. चिनी पदार्थांचं तसंच झालंय. मॅजेस्टिक प्रकाशनच्या 'चायनीज पदार्थ' या मंगला बर्वे लिखित पुस्तकात निरनिराळ्या तऱ्हेची नूडल्स, व्हेजिटेरियन चाऊचाऊ, व्हेजि. चॉपसुई, व्हेजि. चाऊमेन, व्हेजि. मोमो वगैरे पदार्थांबरोबर चिनी चहाचे सगळे प्रकारही दिले आहेत.

'रसचंद्रिका' हा सारस्वत महिला समाजानं केलेला संग्राहक ग्रंथ आहे. पॉप्युलर प्रकाशननं त्याची नववी आवृत्ती काढली. सारस्वत लोकांचं खाणं तोंडाला पाणीच आणतं. ती एक वेगळीच चव आहे. सारस्वत पद्धतीचा साधा, सौम्य पण रुचकर स्वयंपाक कसा तयार करायचा ते यात सांगितलं आहे. त्याशिवाय पुस्तकाला घरगुती औषधं, स्त्रियांचे रोग, बाळंतिणीची शुश्रूषा, निरनिराळे आजार व उपचार, मुलांकरिता पौष्टिक आहार अशी उपयुक्त परिशिष्टं जोडलेली आहेत.

डॉ. के. वि. पानसे यांनी लिहिलेल्या 'आपला आहार' आणि 'आहार आणि जीवन' या दोन पुस्तकांची दखल घ्यावी लागेल त्यांची इतरही, आहारविषयक खूप मोठी ग्रंथसंपदा आहे. पुरुषाने गृहिणींसाठी लिहिलेलं हे पहिलेच ग्रंथ. अर्थात त्यात पदार्थकृती नाहीत, पण उपयुक्त माहिती खूप आहे. आहारशास्त्राच्या दृष्टीनं १९७० मध्येच त्यांनी विचार सुरू केलेला दिसतो. विद्यार्थ्यांचा, खेळाडूंचा, गर्भवती स्त्रियांचा, रुग्णांचा असे वेगवेगळ्या गटांचे आहार काय असावेत, त्याचं त्यांनी फार छान मार्गदर्शन केलं आहे.

आहार, स्वयंपाक हे आता शास्त्र झालं आहे. स्वयंपाक म्हणजे केवळ चवदार चमचमीत पदार्थ ही कल्पना आता मागे पडत चालली आहे. 'डाएट' हा आजकाल परवलीचा शब्द झाला आहे. सुगरणपणाच्या कल्पनाही बदलत चालल्या आहेत. आहाराचा संबंध आरोग्याशी अटळपणे जोडला जात आहे म्हणून आहाराचा बदलत्या काळाच्या संदर्भात पुर्नविचार सुरू झाला आहे. या दिशेनं महत्त्वपूर्ण आणि जाणीवपूर्वक कार्य करणाऱ्यांमध्ये मालती कारवारकर यांचं नाव निश्चितच आधी घ्यायला पाहिजे. त्यांनी आहाराच्या कल्पनांमध्ये क्रांती घडवून आणली, त्याला शास्त्रशुद्ध बैठक प्राप्त करून दिली. नवा आहार चांगला का याचा विचार त्यांनी केला. मालती कारवारकर आणि शोभा वणकुद्रे यांनी मिळून लिहिलेल्या स्वाती प्रकाशनच्या 'स्वयंपाक शोध आणि बोध' या पुस्तकाचा विचार करायला हवा. त्याच्या मते इतर पुस्तकांमध्ये केवळ हजारो पाककृतीच दिलेल्या असतात, स्वयंपाक ही शास्त्रशुद्ध कला आहे याचा विचार कोणी केलेला नसतो.

कॅलरीजना हल्ली फार महत्त्व आलं आहे. खाल्लेलं अन्न शरीरात गेल्यावर त्याचं काय होतं, त्याची सगळी माहिती पुस्तकात सुरुवातीला दिली आहे. शरीराला आवश्यक ते घटक टॉनिक्स आणि व्हिटॅमिन्सच्या गोळ्यांपेक्षा आहारातून अधिक चांगल्या स्वरूपात मिळू शकतात हे पटवून दिलं आहे. योग्य आहार असेल, तरच आरोग्य चांगले राहणार. चौरस आहार म्हणजे महाग, खटपटीचा, रुचिहीन हा गैरसमज या पुस्तकानं दूर करण्याचा प्रयत्न केला आहे. सोयाबीन, यीस्ट, नाचणी हे अतिशय पौष्टिक आणि स्वस्त पदार्थ वापरून पाककृती दिलेल्या आहेत. साधा पण सकस आणि पौष्टिक आहार कसा असावा यावर भर देताना तेल, तूप, साखर या महागड्या वस्तूंचा वापर अतिशय कमी करून टाकला आहे. त्यांची शरीराला तशी गरज नसते. जुन्याच चवी, पण नव्या दृष्टिकोनातून पुढे आणल्या आहेत. कोणत्या पदार्थात कोणती अन्नद्रव्यं किती प्रमाणात आहेत, तेही स्पष्ट केलं आहे.

## डॉक्टर मी काय खाऊ ?

असंच दुसरं महत्त्वाचं अलिकडचं पुस्तक म्हणजे वसुमती घुरू यांचं 'मध्यम वय सावध आहार'. सौ. घुरू या आहारशास्त्राच्या पदवीधर असून न्यूट्रिशन सोसायटी ऑफ इंडियाच्या आजीव सदस्य आहेत. त्यांचं यापूर्वीचं पुस्तक–'सकस आहार' इंडियन कौन्सिल ऑफ मेडिकल रिसर्च या संस्थेच्या शिफारशीवरून त्या 'हॉस्पिटल डाएट' ही संस्था चालवतात. पोषणशास्त्राच्या दृष्टीनं त्या पदार्थकृतींचा विचार करतात. वाढत्या वयाबरोबर, रक्तदाब, मधुमेह, कोलेस्टेरॉल हे रोग सोबतीला येतात. त्यानुसार आहार योजना या पुस्तकात दिली आहे. लेखिका म्हणते, जे लोक जगण्यापुरतं खातात तसंच जे लोक खाण्यासाठीच जगतात, त्या दोघां-

साठीही हे पुस्तक नाही, तर सामान्य लोकांसाठी आहे. या पुस्तकात सकाळ, दुपार आणि रात्र याप्रमाणे आठवड्यातल्या सर्व वाराच खाद्य पदार्थांचं पत्रक दिलेलं आहे.

जी पुस्तकं प्रत्यक्ष वाचायला मिळाली, त्याच पुस्तकाचा या लेखात उल्लेख आहे. प्रसिद्ध झालेली इतर कितीतरी पुस्तकं आहेत. उदा. डॉक्टर, मी काय खाऊ? (मालती कारवारकर), पार्टी पार्टी (निर्मला टिळक), आस्वाद (सुमन बेहेरे), सुरुची (इंदिरा परचुरे) इत्यादी. इतरही काही नावं अनवधानानं सुटली असण्याची शक्यता आहे.

ही सर्व पुस्तकं वाचली की स्वयंपाकात झालेली क्रांती लक्षात येते स्वयंपाकघरही अत्याधुनिक उपकरणांनी सुसज्ज व्हायला लागतय. गॅसवरचा स्वयंपाकही आता कालबाह्य ठरेल की काय अशी शंका येण्याइतपत ग्रिल, किचनेट, कुकिंग रेंज यांच्या जाहिराती झळकताहेत या आणि इतर साधनांनी स्वयंपाक फार सोपा केला आहे. पदार्थांमधली पूर्वीची गुंतागुंत आणि त्यामागचे कष्ट जाऊन स्वयंपाक ही प्रक्रिया अधिकाधिक सोपी आणि साधी होत चालली आहे एकीकडे ती सोपी होत असली तरी 'आहारशास्त्रा'च्या संदर्भात तिला पुन्हा वेगळ्या अर्थानं क्लिष्टता येईल की काय अशीही भीती निर्माण झाली आहे कारण शास्त्राचा अतिरेक झाला तर खाण्यातली मजाच निघून जाईल. काय खाल्याने किती कॅलरीज, किती प्रोटीन्स आणि कोणती जीवनसत्वे मिळतील याचा विचार स्वयंपाक करताना किती गृहिणी करतात? करावा हे मान्य पण ते प्रत्यक्षात कितपत उतरेल? पूर्वीची मागच्या पिढीतली माणसं जे खात होती त्यामुळे शास्त्र म्हणून विचार न करताही त्याचं पोषण उत्तम होत असे. आज आपली आई किंवा सासू जेवढं काम उपसू शकते, तितकं आपण आत्ताच करू शकत नाही मग त्या वयात काय होणार? याचं कारण मुळात अन्नधान्य, भाजीपाला यातलीच सकसता नष्ट होत चालली आहे हे आहे; पण हा विषय शेती, खत, केमिकल्स, हायब्रीड वगैरेचा होईल. त्यातल्या त्यात जो काही कस धान्यात-भाज्यांमध्ये उरतो, तो निदान आहे तेवढा टिकवून पोटात ते अन्न जावं याचं मार्गदर्शन करायला ही पुस्तकं निश्चित उपयुक्त ठरतील. □

# ऐलमा पैलमा, शिक्षणदेवा

लीला पाटील

## शिकवायच्या तऱ्हा

आयुष्यात ज्या वेगवेगळ्या भूमिका आपल्या वाट्याला येतात त्यातल्या दोन भूमिका अटळ असतात. (१) कुटुंबासंबंधीची-गृहिणी अथवा गृहस्थ (२) व्यावसायिक. प्रत्येक प्रौढ व्यक्ती या दोन भूमिका करीतच असते. मात्र भूमिका तीच असली तरी त्या करण्याच्या तऱ्हा वेगवेगळ्या असतात. गृहिणीनं काय काय करायचं-म्हणजे तिची भूमिका कोणती हे कशामुळं ठरतं? (१) समाजाच्या गृहिणीकडूनच्या सर्वसाधारण अपेक्षा — म्हणजेच वेगळ्या भाषेत बोलायचं झालं तर गृहिणीपदाविषयीच्या सामाजिक संकल्पना (२) ज्या विशिष्ट घरात गृहिणी म्हणून वागायचं असतं त्या घरातील वेगवेगळ्या मंडळींच्या गृहिणीपासूनच्या अपेक्षा. (३) स्वतः गृहिणीच्या स्वतःकडून असलेल्या अपेक्षा. या तीन अपेक्षांचा कधी सुमेळ जमतो तर कधी त्यात संघर्ष निर्माण होतो. संघर्ष का निर्माण होतो? वैचारिक अथवा भावनिकदृष्ट्या गृहिणीकडून, घरातील मंडळींच्या अपेक्षा आणि वरीलपैकी दुसऱ्या एखाद्या घटकाची अपेक्षा यांच्यामध्ये फरक निर्माण होतो तेव्हा; केवळ घराची देखभाल करणं, कुटुंबियांना हवं नको पाहणं व नवऱ्याला सर्व प्रकारे खूष ठेवणं म्हणजे गृहिणीपणाची भूमिका पार पाडणं असं मानणारे लोक गृहिणी ही सुद्धा एक व्यक्ती असते, तिच्याही काही आशा-आकांक्षा असतात व घरासाठी समर्पण करायचंच असेल तर ते साऱ्यांनी थोडंथोडं करायला हवं, असं मानीत नाहीत. स्वाभाविकच जेव्हा एखादी तरुणी गृहिणी म्हणून काम करू लागते व स्वतःच शिक्षण अथवा व्यवसाय यांच्या संदर्भात असणाऱ्या जबाबदाऱ्या पार पाडण्याची अपेक्षा कुटुंबियांकडून करते, तेव्हा तणाव निर्माण होतो. आणखीही एक गोष्ट अशी की गृहिणी म्हणून वावरणाऱ्या व्यक्तीचं जे बौद्धिक, भावनिक अथवा कौशल्यात्मक संपन्नत्व असेल त्यावर तिच्या गृहिणीपदाचं संपन्नत्व अवलंबून असतं. उदाहरण सांगायचं झालं तर आहारशास्त्र जाणणारी स्त्री गृहिणीपदाचा एक भाग म्हणून अन्नपदार्थ तयार करतानाही आहारशास्त्राच्या ज्ञानाचा उपयोग करेल. परिणामतः तिनं बनविलेले अन्नपदार्थ आहारशास्त्रदृष्ट्या अधिक सकस व अधिक सुयोग्य असतील. नेमकी हीच गोष्ट शिक्षणाच्या बाबतीतही घडते शिकवायचं म्हणजे काय करायचं-म्हणजेच शिक्षकाची भूमिका कोणती हे (१) शिक्षकपेशाविषयीच्या सामाजिक संकल्पना (२) ज्या विशिष्ट शाळेत शिक्षक नोकरी करणार असतो त्या शिक्षणसंस्थेच्या चालकांच्या शिक्षकाबद्दलच्या अपेक्षा (३) शिक्षकाच्या भूमिकेविषयीच्या त्या व्यक्तीच्या संकल्पना. याशिवाय शिक्षकाची बौद्धिक, भावनिक व क्रियात्मक संपन्नता व स्वतःची भूमिका पार पाडताना त्या संपन्नतेचा केला जाणारा उपयोग यावरही त्या भूमिकेचा पोत (texture) बदलतो काय मंडळी फार अवघड झालं का हे सगळं?

सांगायचा मुद्दा असा की शिकवायच्या नाना तऱ्हा असतात. त्यातील प्रमुख तऱ्हा आपण पाहू या (१) काही शिक्षक 'दिवाबत्तीवाले' असतात (Lamplighter.). त्यांना वाटतं विद्यार्थ्यांच्या अज्ञानाचा अंधःकार छेदून तेथे ज्ञानाचा प्रकाश उजळणारे आपण आहोत. (२) काही शिक्षक 'माळी' (Gardener) वृत्तीचे असतात. विद्यार्थ्यांच्या मनाची मशागत करणं, त्यांना खतपाणी देणं हे आपलं काम असं ते मानतात. (३) आपली भूमिका Muscle Builder ची आहे असं काहींना वाटतं विवक्षित मन टणक करणं हेच त्यांचं ब्रीद असतं. (४) आपण मानव व्यवस्थापक (Personnel Manager) आहोत असं काही शिक्षक मानतात. विद्या-

र्थ्यांना सतत कामात गुंतवून ठेवणं, त्यांना उद्योगी व कार्यक्षम बनवणं हे आपलं काम असं त्यांना वाटतं. (५) काही शिक्षक 'बादलीभरण' (Bucket Filler) असतात. विद्यार्थ्यांची मनं म्हणजे जणू मोकळ्या बादल्या व त्या माहितीनं काटेकोर भरणं हेच आपलं काम असं ते धरून चालतात. शिक्षकांच्या या पाच तऱ्हा म्हणजेच शिकवायच्या पाच तऱ्हा किंवा शिक्षकाच्या भूमिकेच्या पाच तऱ्हा हे तुमच्या लक्षात आलंच असेल.

शिकवायच्या या पाच तऱ्हा वेगवेगळ्या मांडल्या असल्या तरी चांगल्या शिक्षकाच्या अध्यापनात या तऱ्हांची सरमिसळ झालेली आढळते. चांगला शिक्षक कधी माहिती देतो, कधी विचारांना / कल्पनांना / कौशल्यांना खतपाणी पुरवितो. विद्यार्थ्यांना कामात गुंतवून ठेवणं, कार्यक्षम बनवणं याकडंही चांगल्या शिक्षकाला लक्ष पुरवावं लागतं. विद्यार्थ्याचं मन जागं करण्यासाठी चांगल्या शिक्षकाला कधी त्याच्या मनातील ज्योत पुढे सारावी लागते; कधी त्यासाठी इंधन पुरवावं लागतं तर कधी ज्योत पेटवावी लागते. पुरेशा व्यायामाअभावी—म्हणजेच योग्य त्या कामाअभावी—विद्यार्थ्याचं मन / बुद्धी विसविशीत बनते. अशावेळी चांगल्या शिक्षकाला मसल बिल्डिंगचंही काम करावं लागतं. तेव्हा आपण हे समजून घ्यायला हवं की चांगल्या अध्यापनात वरील पाचही तऱ्हांचा समावेश असतोच.

शिकवायच्या या तऱ्हांचा आपण कशासाठी विचार करतो आहोत ? शिक्षकांना प्रशिक्षण देणारे शिक्षक—प्रशिक्षक किंवा प्रशिक्षणासाठी दाखल झालेले विद्यार्थी—शिक्षक यांच्या या क्षेत्रात सामान्य वाचकाला / सामान्य पालकाला कशाला ओढायचं ? तुम्ही—मीच या गोष्टीचा विचार केला पाहिजे अशी परिस्थिती आहे म्हणून ! सर्वसाधारणपणे बोलायचं झालं तर 'बादलीभरू' पणाचीच शिकवायची तऱ्हा दिसून येते. कित्येक वेळा तर बादली गळकी आहे की धड आहे हेसुद्धा पाहिलं जात नाही. बादली पालथी आहे की उलथी आहे याचा विचार होत नाही. माहितीचा वर्षाव उपड्या घड्यावर होतोय असं म्हणण्याइतकी परिस्थिती त्या वर्गात असते. परंतु माहिती ओतणं हेच शिक्षकाचं काम




असंच मानणारा ती माहिती जिथं ओतायची त्याच्या स्थितीकडं कशाला लक्ष देतो ? अर्थातच हे बरोबर नाही हे कोणालाही पटेल. मग पटूनसुद्धा वास्तवात त्याची दखल का घेतली जात नाही ? विद्यार्थ्याचं मन माहिती घेण्यासाठी योग्य प्रकारे प्रेरित करणं, त्याला समजेल अशा रीतीनं ती माहिती त्याच्यापुढं मांडण्यासाठी जीवनातले दाखले देणं, गुंतागुंतीची माहिती स्पष्ट होण्यासाठी प्रतिकृती, आलेख, चित्रं, नकाशे, चित्रपट्टिका (slides) अशा अनेकविध माध्यमांचा वापर करणं हे सारं वेळखाऊ व जिकिरीचं असतं. समाजाला सामान्यपणे जे हवं आहे—शालांत परीक्षेत पास होणं—अधिक गुण मिळवणं—ते शिकवण्यातल्या वरील वेळखाऊ व जिकिरीच्या गोष्टी न करता देखील करता येतं. शिवाय ते करण्यात साहाय्याला धावलेले 'क्लासेस' गल्लोगल्ली आहेतच ! शिक्षकाचं भवितव्य विद्यार्थ्यांच्या पास-नापासीवर फारसं अवलंबून नसलं तरी मुलाच्या पास-नापासीमुळं पालकाची जबाबदारी कमीअधिक होत असते. एखाद्या सार्वजनिक नळापाशी ज्याप्रमाणं बादली, घागरीच्या रांगाच्या रांगा असतात त्याप्रमाणं आईबाबांनी क्लासेसच्या दारात उभ्या केलेल्या मुलांच्या रांगांच्या रांगा सगळीकडं दिसतात. तेव्हा मंडळी मला काय सांगायचंय हे तुमच्या लक्षात आलं असेल. अगदी 'बादली भरू' प्रकारचा चांगला शिक्षक व्हायचा म्हटलं तरीसुद्धा खरं म्हणजे विद्यार्थ्याची मन:स्थिती, त्याची क्षमता त्याची सामाजिक / सांस्कृतिक / ज्ञानात्मक पातळी माहिती, सुगम करणाऱ्या वेगवेगळ्या साधनांचा वापर अशा नानाविध बाबी त्यात येतात. आपण चांगले बादलीभरू शिक्षक तरी आहोत का याचा शोध आमच्यासारख्या शिक्षकांनी घ्यायला हवा. आणि आपल्या मुलांना मिळालेले शिक्षक निदान चांगले बादलीभरू शिक्षक कसे होतील याचा विचार समाजानं करावयास हवा.

विद्यार्थ्यांच्या मनाची मशागत करायचं हे काम वाटतं तितकं सोपं नाही. मशागत करण्यासाठी नाना प्रक्रिया कराव्या लागतात. जमिनीचा दर्जा तपासून घ्यावा लागतो, जमीन उकरून घ्यावी लागते, उकरलेली जमीन तोडावी लागते, जमिनीचा दर्जा, उपलब्ध खतपाणी व मानवी शक्ती लक्षात घेऊन जमिनीत काय पेरायचं हे ठरवावं लागतं. ते ठरविल्यावर आवश्यकतेनुसार वाफे करावे लागतात व नंतर कधी पाणी देऊन तर कधी पाणी तोडून योग्य खते व जंतुनाशके यांचा वापर करावा लागतो. अगदी थोडक्याच प्रक्रिया नोंदवायच्या म्हटलं तरी इतकं सगळं लिहावं लागलं. आता आपण जे जे लिहिलं ते ते मनाच्या मशागतीसंबंधी कितपत खरं आहे ते पाहू या. विद्यार्थ्याची बुद्धी, त्याच्या विविध बौद्धिक क्षमता यांची परीक्षा करून आपण विद्यार्थ्याला शाळेतील इयत्तात प्रवेश देतो का ? 'आठवीत जाण्यास लायक' असं प्रशस्ति-



पत्रक हातात धरून आलेला विद्यार्थी बौद्धिक भावनिक व कौशल्यात्मक विकासाच्यादृष्टीनं खरोखरीच आठवीत जाण्यास लायक असतो का ? काही शिक्षक म्हणतील लीलाताईंना व्यवहार समजत नाही. वर्गावर्गात किती विद्यार्थी आहेत यावर शाळेत किती शिक्षक असणार हे ठरतं. विद्यार्थ्यांची बौद्धिक, भावनिक व कौशल्यात्मक क्षमता विचारात घेऊनच विद्यार्थ्याला पास करायचं असं ठरविलं तर काही शिक्षकांच्या पोटावर पाय की हो येणार ! तेव्हा काही विषयातले गुण वाढवायचे, प्रात्यक्षिक परीक्षेत जितके देता येतील तेवढे गुण द्यायचे, उत्तरपत्रिका जरा ढिलाईनं तपासायच्या व विद्यार्थ्याला या इयत्तेतून वरच्या इयत्तेत पाठवायचं. पालक खूष, शिक्षक खूष, संस्थाचालक संतुष्ट, शासन संतुष्ट !

विद्यार्थ्याच्या बौद्धिक व भावनिक दर्जानुसार त्यानं काय शिकावं हे ठरविण्याचे पर्याय उपलब्ध असतातच कुठं ? सब घोडे बाराटक्के. या संदर्भात जास्त काही लिहिण्यापेक्षा काही प्रसिद्ध उदाहरणंच पाहू. प्रसिद्ध संशोधक न्यूटन हा शाळेत अल्लड मानला गेला. एडिसन लहान असताना, त्याच्या शिक्षकांनी He is too stupid to learn anything असं म्हटलं होतं. जो पुढे संगीततज्ज्ञ व संगीतकार म्हणून प्रसिद्ध झाला अशा बीथोव्हेनबद्दल संगीत शिक्षक म्हणाले होते As a composer he is hopeless ! लुई पाश्चर या संशोधकाला महाविद्यालयात Mediocre ही श्रेणी मिळाली होती. इंग्लंडचे एके काळचे पंतप्रधान विन्स्टन चर्चिल सहाव्या इयत्तेत नापास झाले होते. लांब कशाला, आपल्या देशातले रवींद्रनाथ टागोर यांची गुणवत्ता तरी शाळेनं कधी मान्य केली ? आजच्या प्रसिद्ध अभिनेत्री स्मिता पाटील एका मुलाखतीत म्हणाल्या की, शाळेत असताना कोणत्याही सहशालेय कार्यक्रमात भाग घेण्याची संधी त्यांना मिळाली नव्हती. या सगळ्या उदाहरणांवरून उलटा निष्कर्ष काढायचा नाही जो जो शाळेत अथवा महाविद्यालयात ढ ठरतो तो तो पुढे मान्यता पावतो असा निष्कर्ष काढण्यासाठी ही उदाहरणं दिली नाहीत. ही उदाहरणं तुम्हाला मला सांगताहेत की, सर्जनाला (creativity) मौलिकतेला ( originality ), प्रतिभेला ( Inspiration ) शिक्षणसंस्थात फारसा वाव नसतो. विद्यार्थ्याचा दर्जा लक्षात घेऊन त्यानं काय शिकावं हे ठरविलं जात नाही.

परसोनेल मॅनेजरची भूमिका मुख्याध्यापक शिक्षक बऱ्याच अंशी वजावताना दिसतात. करड्या शिस्तीचं पालन, गृहपाठांचे ढीग उपसणं, एका पाठोपाठ येणाऱ्या परीक्षांना सामोरं जाणं, शाळेतील विविध कार्यक्रमांना उपस्थित असणं, गणवेश घालणं, रांगेत चालणं, हात वर करून परवानगी मिळाल्याशिवाय न बोलणं, सबळ कारण असल्याशिवाय अनुपस्थित न रहाणं, जरा काही हातून अनुचित घडलं तर मुख्याध्यापकाजवळ जाऊन खुलासा देणं– अशा नाना प्रकारे



विद्यार्थ्याला वरपांगी तरी उद्योगी व कार्यक्षम ठेवण्याचा प्रयत्न जारी असतो. गाडीच्या बैलाला किंवा टांग्याच्या घोड्याला जशी झापड लावतात तशी झापड विद्यार्थ्याला बांधून त्याला 'चांगला विद्यार्थी' बनविण्याचा प्रयत्न सुरू असतो; परंतु या सगळ्या प्रयत्नातून हाती काय लागतं ? शिस्तीच्या वरवंट्या खाली चेंगरलेली मनं ! माहितीच्या ढिगाऱ्याखाली कोमेजलेली सृजनशीलता, मौलिकता व प्रतिभा आज्ञापालनाच्या नावाखाली मनामनात गोठलेले असंख्य प्रश्न. आव्हानांच्या अभावामुळं नपुंसक झालेली व्यक्तित्वं.

आमच्या घरी संतोष या नावाचा एक छोटा मुलगा येतो. तो मोठी मजा करतो. अवजड खुर्ची इकडून तिकडं ढकलतो व कोपरापासून खालचा हात वाकवून स्वतःच्या दंडाकडं पहात सांगतो 'ताकद आहे. ताकद आहे.' त्यानं एखादं कापड उचललं, फुलदाणी इकडची तिकडं ठेवली तर तो कधी स्वतःच्या ताकदीचा उल्लेख करीत नाही. मला वाटतं संतोषला हे उमजलं आहे की, ताकद येण्यासाठी–स्नायू टणक होण्यासाठी थोडं अवजड काम करावं लागतं. शिक्षणामुळं विद्यार्थ्याची बुद्धी, मन, शरीर सबल व सक्षम करायचं असेल तर संतोषला जे उमजलं आहे ते आमच्यासारखं शिक्षकाला उमजायला हवं. आजच्या आपल्या अध्यापन पद्धतीत मन, बुद्धी अथवा शरीर सबल व सक्षम होण्यास फारसा वाव नसतो. एखाद्या क्रेनद्वारा इकडचं ओझं उचलून तिकडं ठेवावं त्याप्रमाणं अनेक शिक्षक क्रमिक पुस्तकातील माहिती वाचून दाखवून, माहिती कथन करून अथवा तीच माहिती लिहून देऊन शिकविण्याचं काम पार पाडतात. क्रमिक पुस्तकातील माहिती व शिक्षकाची आजवरची माहिती, त्याचे जीवनानुभव, त्याचे चिंतन, त्याचं निरीक्षण यांचा मुळी संबंधच येत नाही. क्रेनचा व क्रेनद्वारा उचलल्या जाणाऱ्या ओझ्यांचा कुठं संबंध येतो ? ओझं दगड आहे की सोनं ? मऊ आहे की घट्ट ? द्रव आहे की घन ? हितकारक आहे की अहितकारक? या प्रश्नांचा क्रेनशी संबंधच येत नाही. इथून उचलणं व तिथं ठेवणं हे क्रेनचं काम ! जे शिक्षक क्रेनसारखंच काम करतात तेही क्रेनसारखेच तटस्थ, शुष्क, चेतनाहीन राहतात. समोर दिसणारं प्रत्येक मूल वेगळं आहे. क्रमिक पुस्तकातील माहिती व शब्दांपेक्षा अधिक काही शिकविण्यासाठी आपण आहोत, जीवनातले अनेक संदर्भ क्रमिक पुस्तकातील माहितीत मिसळवल्याशिवाय सजीव होत नाहीत, असे अनुभव न येणाऱ्या शिक्षकांच्या सेवेचा काल, संख्यात्मक दृष्टीनं वाढत असला तरी उलटणाऱ्या दर वर्षाबरोबर त्यांचा गुणात्मक विकास होतोच असं नाही. अशा शिक्षकांकडून विद्यार्थ्यांना जे शिकविलं जातं त्यामुळं त्यांच्या बुद्धीला, मनाला व शरीराला विविध व सतत आव्हान मिळण्याची शक्यता कमी असते. क्रमिक पुस्तकांच्या बाबतीत शिक्षकांनी जे काम केलं तेच काम विद्यार्थ्यांनी परीक्षेच्या वेळी




करावं अशी मर्यादित अपेक्षा ठेवल्यामुळं क्रमिक पुस्तकातील माहिती पूर्णपणे समजून घेणं, त्यावर विचार–चर्चा करणं, प्रत्यक्ष जीवनाच्या संदर्भात त्या माहितीचा पडताळा घेणं, अवांतर वाचन, संदर्भ पुस्तकांचं वाचन मुलाखती, दृकश्राव्य साधनं अशा अनेक माध्यमांच्या वापराद्वारा ती माहिती स्वतःच्या व्यक्तिमत्त्वाचा एक भाग बनविणं व त्या माहितीचा वापर करून काही नवे अनुभव घेणं अशा कोणत्याच प्रक्रिया विद्यार्थ्यांच्या बाबतीतही घडत नाहीत. विद्यार्थ्यांच्या अंतरंगाशी एकजीव न झालेली ही माहिती परीक्षेद्वारा फक्त बाहेर टाकली जाते, विद्यार्थ्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या विकासासाठी तिचा उपयोग होत नाही. व्यक्तिमत्त्वाचा विकास व मिळणारी माहिती यांचा आंतरसंबंध जुळायचा असेल तर Education is stretching process या तत्त्वाप्रमाणे विद्यार्थ्याला विविध आव्हानं सतत मिळायला हवीत. ती आव्हानं पेलूनच त्याच्या व्यक्तिमत्त्वात ताकद निर्माण होईल. व्यक्तिमत्त्वाचा विकास होईल.

आतापर्यंत आपण केलेली सगळी चर्चा शिक्षकासंबंधीचीच आहे; पण पालक व समाजाचा एक घटक म्हणूनही आपण मुलांबाळांना काही शिकवायचा प्रयत्न करीत असतो. आपल्याही शिकवायच्या तऱ्हा सर्वसाधारणपणं वरच्या पाच तऱ्हांप्रमाणंच असतात. $2H+0=H_2O$ हे समीकरण जसं आपण सर्वसाधारणपणं शब्दांच्या माध्यमातूनच शिकवतो तसच सदाचार–नीतीही आपण शब्दांच्या पाकिटातूनच त्यांच्यापर्यंत पोचवितो. अनुभूतीची जोड असल्याशिवाय जे शिकता येणार नाही असे वृत्ती बदलाचे अनेक भाग शब्दांत बदल करून शिकविता येतात, असं आपण सोयीस्कररीत्या मानतो. जीवनातूनच जन्म पावणारं व जीवनाचाच एक भाग असणारं शिक्षण जीवनापासून तोडून काढून निष्प्राण शब्दांत बंदिस्त होऊ शकतं या विचारानं पाठांतर व स्मरण यावर भर देऊन आपण मुलांना जीवनासाठी तयार करणारं शिक्षण देतो अशी समजूत करून घेतो. विद्यार्थ्यांच्या–मुलाच्या व्यक्तिमत्त्वाच्या विकासाचा प्रवास केवळ शब्दांतून शब्दांकडे आहे असं मान्य करून वागतो. आपली उक्ती आणि कृती यांच्यातली ही दरी मोडल्याशिवाय श्रद्धेची ज्योत अंतःकरणात प्रदीप्त करणं, मनाची मशागत करणं, बुद्धी सतेज बनवणं शक्य होणार नाही.

शिकवायच्या तऱ्हा शिकवायच्या आशयांचे जे अग्रक्रम असतात त्यावरून ठरतात. विविध लोकांचे अग्रक्रम भिन्नभिन्न असतात. असे काही अग्रक्रम आपण पाहू. (१) व्यक्तिमत्त्वाचा आदर करणं (२) वाचणं (३) क्रियाशील विद्यार्थी बनणं (४) बेरीज-वजाबाकी, भागाकार-गुणाकार करता येणं (५) प्रेम करण्यास शिकणं (६) आत्माविष्कार करणं (७) प्रामाणिक बनणं (८) टापटीप शिकणं (९) इतरांच्या कल्पना ऐकणं (१०) नियमांनुसार वागायाला शिकणं (११) समस्या सोडवायला शिकणं (१२) आत्मविश्वास निर्माण होणं (१३) अध्ययनाचा आनंद घेण्यास शिकणं ही यादी वाचताना यापैकी कोणती बाब शिकवायच्या कोणत्या तऱ्हेशी मिळतीजुळती आहे याबद्दलचे विचार तुमच्या मनात साहजिकच आले असणार आणि आले नसले तर तसा विचार करायला हवा. तसंच शिकवायच्या आशयाचे जे अग्रक्रम मांडले त्यापैकी काही तुम्हाला पसंत असतील, काही नापसंत असतील. काहींचे तुमचे अग्रक्रम वेगळे असतील किंवा या यादीत न आलेल्या काही बाबी शिकवायच्या आशयाच्या यादीत आल्याच पाहिजेत असं तुम्हाला वाटत असेल. तुमचं हे सारंच वाटणं बरोबर आहे. प्रश्न एवढाच की हे सगळं हा लेख वाचल्यावरच वाटायला लागलं की हा लेख वाचण्यापूर्वीच वाटत होतं? याच्या आधी वाटत नसेल तर का वाटत नव्हते? आणि आता वाटायला लागलं असलं तर ते वाटणं अधिक सखोल, अधिक समग्र, अधिक सूक्ष्म होण्यासाठी तुम्ही–मी शिक्षकांच्या व पालकांच्या तऱ्हांबाबत काय करणार आहोत? □



शोभा भागवत

# दोन पूर्ण माणसं

**आ**युष्यभर खूप दारिद्र्य, अपमान, दैन्य, संकटं, निराधारपणा सहन केलेले एक गृहस्थ एकदा सांगत होते. 'स्त्री, पुरुष हा भेद खरा नाही. पुरुषावर संकटं येतात, त्याला दुःख भोगावं लागतं तेव्हा तो स्त्रीच होत असतो आणि बाईवर संकट येतं तेव्हा ती पुरुष होत असते. धीटपणे संकटाला तोंड देत असते. मी माझं जीवन जगलो ते बाई म्हणूनच जगलो.'

त्यांचं हे सांगणं फार प्रामाणिकपणाचं, अर्थपूर्ण होतं. विचारात पाडणारं होतं. संकटं आली की पुरुष बाई होतो म्हणजे काय? म्हणजे त्याच्यातला पुरुषीपणा कमी होतो. पुरुषीपणा म्हणजे काय? आणि बाईपणा म्हणजे काय? हे काही वेगळं सांगायची जरूर नाही. काही एका गुणांचा संच म्हणजे पुरुषीपणा काही एका गुणांचा संच म्हणजे बाईपणा. त्यात मग बाईनी शालीन, नम्र, मऊ, मवाळ, कष्टाळू, गोड, प्रेमळ, सेवातत्पर असावं तसं पुरुषानं धीट असावं, त्याच्यात धडाडी असावी, खंबीर असावं, त्यानं इतराना आधार द्यावा अशा अपेक्षा असतात.

हे सगळं इथवर ठीक आहे. हे कोणतेही गुण वाईट नाहीत; पण काळाच्या ओघात, स्त्री-पुरुषांच्या कप्पेबंद जगण्यात आणि जबाबदाऱ्यात या गुणांच्यात अनेक दोषांची बेमालूम सरमिसळ झाली. शालीन नम्र म्हणजे खाली मान घालणं, धीटपणा नसणं,

कचखाऊ असणं असा अर्थ आला. मऊ मवाळ म्हणजे दुसऱ्याकडून थपडा खाणारी असा गर्भितार्थ चिकटला. कष्टाळू म्हणजे दुसऱ्याकडून कसलीही अपेक्षा न ठेवता राब राब राबणारी आणि त्यात धन्यता मानणारी ही अपेक्षा तयार झाली. बाईच्या गोडपणाचं कृत्रिम आणि विकृत स्वरूप तर आज आपण जिकडे तिकडे, टी. व्ही. वर, जाहिरातीत, सिनेमात पहातच असतो.

या विकृती जशा बाईला चिकटल्या तशा पुरुषालाही चिकटल्या. त्याचा धीटपणा, धडाडी, खंबीरपणा यात नकळत उर्मटपणा, उद्धटपणा, बेपर्वाई मिसळली. बाई सेवा करणारी त्यामुळे पुरुष कायम सेवेची अपेक्षा करणारा असं समीकरण तयार झालं. स्त्री पुरुषांमधली दरी रूंदावत गेली आणि आपापल्या बाईपणाच्या किंवा पुरुषपणाच्या टोकाला जाऊन 'माणसांना' काय मिळालं? त्यांनी गमावलंच पुष्कळ.

स्त्री-पुरुषांच्या ह्या ठोकळेबाज प्रतिमांना खूप काळ आपण बळी जात असतो. त्या आदर्श मानत असतो; पण त्या पलीकडे जाऊन स्वतःचा शोध घेतला तर असं जाणवत रहातं की, स्त्री म्हणून जन्माला आलो म्हणून काही गुण त्यांना चिकटलेल्या दोषांसकट आपल्यावर लादून घ्यायचं काहीच कारण नाही.

आई आणि वडील म्हणून वागत असतानाही या प्रतिमा आपल्यावर हुकुमत गाजवत असतात. आई म्हणून घरातल्या सगळ्या प्रेमाचा ( म्हणजे इतरांवर प्रेम करण्याचा ) साठा कुणी माझ्याच माथी मारू लागलं तर मला ते कसं आवडेल ? प्रेम करणं हे जर माझं कर्तव्य असेल तर प्रेम मिळणं हीही त्या कर्तव्याची दुसरी बाजू आहेच. मी नम्रपणे वागायचं असं ठरलेलं असेल तर इतरांनीही माझ्याशी नम्रपणे वागलं पाहिजे. मी कष्टाळू असलं पाहिजे याचा अर्थ फक्त मीच कष्टाळू असलं पाहिजे असा तर नाही ना ? हे मला स्त्री म्हणून, आई म्हणून, पत्नी म्हणून प्रश्न पडतात.

घराघरातल्या पुरुषांच्या, वडलांच्या प्रतिमेबद्दलही असेच प्रश्न समोर उभे रहातात. खंबीर, धडाडीचे, मर्दानी असे वडील घरात दरारा राखून असतात. बायकोच्या किंवा मुलांच्या कुठल्याही चुकीबद्दल ते हवं तसं ओरडू शकतात. त्यांच्या गरजा वेळेवर पुऱ्या व्हाव्यात म्हणून सारं घर झटत असतं. ते फारस सहज, गमतीचं, मोकळं कधी बोलत नसतात. त्यांचा आणि मुलांचा रागावण्याखेरीज फारसा संबंधच येत नसतो.

सगळ्या वडलांनी आपल्या मनातली वडील म्हणून असलेली प्रतिमा तपासून पहावी (वडलांना बहुधा अशा गोष्टांना वेळ नसतो त्यामुळे हा उद्योग आयांना करावा लागेल.)

ह्या प्रतिमेला अपवाद असणारे खूप वडील भेटतील. त्यांच्या डोक्यात आपल्या पुरुषपणा विषयी, आपल्या अधिकाराविषयी गैरसमजुती नसतात. घरासाठी, मुलांसाठी, बायकोच्या बरोबरीनं ते कष्ट सोसत असतात. बायको-मुलांबरोबर त्यांचं जिव्हाळ्याचं भावनिक नातं असतं. घरात त्यांची कुणाला भीती वाटत नाही; पण आधार मात्र वाटतो

ह्या प्रतिमेतले अधिक तपशील आपण कुणीही भरू शकू.

असंच आईबद्दलही. निव्वळ बाई म्हणून बाईपणाचं ओझं मिरवणारी आई ही पूर्ण माणूस नसते. तिच्यात धडाडी, खंबीरपणा, दुसऱ्याला आधार देण्याची कुवत, निर्णयक्षमता हवीच.

थोडक्यात आपण येऊन पोचतो ते 'माणूस' पणाच्या आदर्शापाशी. बाईमध्ये थोडा पुरुषपणा हवा, पुरुषात थोडा बाईपणा हवा तर ते चांगलं माणूस होऊ शकतं आणि चांगलं पालकही.

वडील नसलेली मुलं जास्त शहाणी, समंजस, हुशार असतात असं म्हणतात. त्याचं कारण हेच तर नसावं ? आईला साहजिकच आई आणि वडील ह्या दोन्ही भूमिका पार पाडाव्या लागतात आणि त्या प्रक्रियेत मुलांना दोन 'अर्धी माणसं' पालक म्हणून मिळण्याऐवजी एक संपूर्ण माणूस पालक म्हणून मिळतं त्याचा चांगला परिणाम होतो का ?

पण ही तरी अट का असावी ? काहीतरी संकट आल्याशिवाय आईला पूर्ण माणूस होता येऊ नये ? वडलांना पूर्ण माणूस होता येऊ नये ? ते दुःख सोसलेले गृहस्थ म्हणतात ते हेच ना! संकटामुळे ते बाईचं जीवन जगले. संकट न येता उघड्या डोळ्यांनी आपल्याला ही भूमिकांची सरमिसळ करता नाही का यायची ? दोन पूर्ण माणसं मुलांना पालक म्हणून का मिळू नयेत ?

□

## शिवचरित्राचे रंगमंचीय दर्शन

# जाणता राजा

वि. भा. देशपांडे

बाबासाहेब पुरंदरे हे नाव शिवचरित्र लेखन आणि कथन यांच्या संदर्भात सर्वपरिचित आहे. सर्वसामान्य जनतेसमोर शिवचरित्र ठेवून त्याना स्फूर्तिदायक होईल अशा हिशोबाने त्यानी आपला बाज राखला आहे. इतके दिवस लेखन आणि कथन—भाषण ह्या माध्यमातून व्यक्त होणारे शिवचरित्र बाबासाहेबानी रंगमचावर दृश्यरूपात 'जाणता राजा' या नावाने नुकतेच पेश केले.

'जाणता राजा' या शीर्षकावरूनच दिशा आपल्या ध्यानी येते ती म्हणजे शिवछत्रपतीच्या जीवनातील प्रेरक, बोधक प्रसगांचे चित्रण यामध्ये असणार. तसेच आहे शिवजन्मापासून राज्यारोहणापर्यंतचा कालखंड नाटयरूपासाठी निवडला आहे तो निवडताना जे तपशिलात प्रसग वापरले आहेत त्यामध्ये शिवरायांच्या अगी असलेल्या प्रत्येक सद्‌गुणाचे दर्शन व्हावे अशी योजना आहे. शिवराय हे कल्याणकारी राजे होते. स्वतःच्या स्वार्थापेक्षा रयतेचे सुख मोठे मानणारे, त्या सुखासाठी प्राण पणाला लावणारे, लोकन्याय समतोलाने करणारे असे बहुगुणी राजे होते. त्यांच्या ह्या सद्‌गुणाचे दर्शन घडवण्यासाठी त्यानी जे जे कठोर निर्णय घेतले, ज्या आज्ञा केल्या, जे धोके पत्करले त्या गोष्टी महत्वाच्या ठरल्या. आपल्या हाताखालच्या अधिकाऱ्याना ते सांगत की, 'रयतेच्या भाजीच्या देठालाही हात लावू नका!' मामाच्या हातून गुन्हा घडला तर रक्ताच्या नात्याचा विचार बाजूला ठेवून कर्तव्य श्रेष्ठ मानून त्याला शिक्षा फर्मावली. अशीच शिक्षा अत्याचार, अनाचार करणाऱ्या एका पाटलालाही केली. कारण ज्याने रयतेला संरक्षण द्यायचे त्यानेच गुन्हे करायचे अशा माणसाला सजा व्हायलाच पाहिजे हा त्यामागे विचार होता. धर्मनिरपेक्ष माणुसकीचे दर्शन घडवणारा प्रसग म्हणजे मतावेगमला आई मानले. ह्या आणि अशाच छोटया—मोठया प्रसंगाची साखळी या नाटयरूपात आहे. त्याच्या जोडीला सर्वपरिचित असे काही प्रसग आहेतच उदा विविध किल्ले घेणे, आग्र्याहून सुटका, अफझलखानाचा वध, शाहीस्तेखानाची बोटे कापणे इत्यादी.

बाबासाहेबाना शब्दाचे अतीव प्रेम आहे हे त्यांच्या लेखन—कथन यावरून सहजच जाणवते. ते प्रेम याही ठिकाणी आहे. या ठिकाणी माध्यम बदलल्यावर शब्दाचा सोस थोडा कमी होता तर चालले असते असे वाटून गेले. जे समोर दिसते आहे किंवा दिसणार आहे त्या बद्दल प्रमाणापेक्षा अधिक शब्दाची गरज नव्हती नाटयरूपासाठी ऐतिहासिक विषयाची निवड आणि त्यातही शिवकथा असल्याने ती आलेल्या मराठी प्रेक्षकाला सर्वपरिचित अशीच असते. ज्यावेळी चरित्रात्मक पातळीवर ऐतिहासिक व्यक्तीचा जीवनपट उलगडून दाखवला जात असतो तेव्हा लेखक अथवा प्रयोगकर्ते याचे अर्धेअधिक यश निश्चित झालेले असते. कारण येणाऱ्या माणसाला त्या व्यक्ती जीवनातील अनेक तपशील विस्ताराने माहीत असण्याची शक्यता असते. त्याच तपशिलाना उजाळा देण्यासाठी ते वेगळ्या माध्यमातून अनुभवण्यासाठी तो उत्सुक असतो. तपशील जुळने—मिळते असले म्हणजे आस्वादन सुखाचे जाते. जर प्रेक्षकाच्या मनातील शिवप्रतिमेला छेद देण्याचा प्रयत्न झालाच तर प्रश्न निर्माण होण्याचा धोका असतो. पण तो प्रश्न इथे नव्हता. तसा येण्याचे काही कारणच नव्हते. त्यामुळेच असे वाटत राहिले की, दृश्याच्या तुलनेत शब्दाचा पसारा कमी असायला हवा होता. परिणामी प्रयोगाचा कालावधी आणखी कमी झाला असता. तसा तो होण्याची आवश्यकता आहेच!

एरवी शिवचरित्र कथन करण्याची बाबासाहेबाची जी शाहिरी पद्धत आहे त्याचाच वापर या ठिकाणी प्राधान्याने केला गेला. शाहिराचा ताफा पुढे येणाऱ्या प्रसंगाचे कथन किंवा वर्णन करीत असे आणि तो प्रसंग दृश्यरूपात उभा राहात असे. पण केवळ शाहिरी कवनाचा अथवा पोवाडयाचाच वापर झाला असे नव्हे तर लोकसंगीतातील अन्य लोककलाप्रकाराचाही वापर झाला. उदा. लावणी, कवाली, वाघ्या – मुरळी, गोंधळ, भजन, भारुड इत्यादी.

या प्रयोगासाठी निश्चित स्वरूपाची बदिस्त अशी एक सहिता तयार केलेली होतीच. ती आवश्यकही होती. त्यातले संवाद आणि संगीत ध्वनिमुद्रित केलेले होते. त्यामुळे तेही विशिष्ट चौकटीत बाधलेले होते. रंगमचावर काम करणाऱ्या कलावंताना त्या चौकटीमध्येच आपले व्यवहार करणे भाग होते. त्यामध्ये उत्स्फूर्ततेला वाव नव्हता; पण ही जशी सोय ठरते तसेच ती कलाकाराला बांधून ठेवते ही गैरसोय होते. अशा समूहनाटयात व्यक्तिगत अभिनयाचा प्रश्न उद्‌भवतच नसतो; पण तो समूह जेव्हा एखादे रूप घेऊन सामोरा येतो तेव्हा त्याचा म्हणून एक सार्वजनिक चेहरा असतो. तो प्रेक्षकाला वाचता आला पाहिजे. त्याचा एकसंघ—एकत्रित परिणाम घडावा लागतो. तसा तो काही समूहाच्या संदर्भात घडला, तर काही ठिकाणी घडला नाही. उदाहरणार्थ कोळीनृत्य, वाघ्या-मुरळी, लावणीला किंवा कवालीला दाद देणारी मंडळी इत्यादी. यातल्या अनेक मंडळींनी यांत्रिक हालचाली केल्या. त्यातली जो आंतरिक लय किंवा तालाचे भान आतूनच असावे लागते ते कमी असल्याने ती यांत्रिकता परिणाम उणावत होती. जिथे समूह सोडून व्यक्तिरेखा स्वतत्रपणे उभारलेल्या होत्या तिथे अभिनयाची अपेक्षा निश्चितच होती, तिथे तर निराशा जाणवण्याइतकी होती. विशेषतः मोठा शिवाजी, वृद्ध जिजाई, शिवरायाच्या पत्नी इत्यादी. रगमच आणि प्रेक्षक याच्यातले अतर जाणवण्याइतके असल्याने अभिनयाचे बारकावे दिसले नसतील किंवा त्याची अपेक्षा करू नये असे म्हटले जाईल. त्यावर एवढेच म्हणता येईल की, ज्यावेळी असे अंतर अधिक असते तेव्हा विशिष्ट प्रकारची समीप अशी (क्लोजप) प्रकाशयोजना करून केवळ त्या व्यक्तीचा चेहरा तपशिलात दिसेल असे करणे अभिप्रेत आहे असे अंतर असूनही गागाभट्ट, नाईक, काही प्रमाणात औरंगजेब यांच्या स्वराभिनयाचे किंवा मुद्राभिनयाचे अनेक तपशील आमच्यापर्यंत पोहोचले. औरगजेबाने आपल्या सरदाराना उद्देशून केलेले भाषण निराळ्या अर्थाने शिवचरित्राची प्रतिमा अधिक मोठी करणारे

## मुंबई महापालिका निवडणूक

# मराठी मत शिवसेनेमागे का गेले ?

अभय गोखले

महाराष्ट्र राज्याच्या स्थापनेचे हे रौप्यमहोत्सवी वर्ष; पण आज मुबईमध्ये महाराष्ट्र शासनाच्या नाकर्तेपणामुळे मराठी माणसाची जी जोरदार पिछेहाट चालू आहे ती अशीच चालू राहिली तर महाराष्ट्र राज्याच्या स्थापनेचा सुवर्णमहोत्सव मुबईशिवाय महाराष्ट्रातील जनतेला साजरा करावा लागेल, अशी शक्यता आहे

आज मुबईमध्ये प्रत्येक क्षेत्रात मराठी माणसाला दुय्यम स्थान देण्यात येत असून जागोजागी त्याला आपल्याच राज्याच्या राजधानीत अपमान सहन करावा लागत आहे. मुबईमध्ये तुम्हाला मराठी येत नसेल तरी चालेल, तुमचे काही अडणार नाही मात्र तामिळी, कानडी, बगाली, हिंदी वगैरे भाषा अवगत असतील तर झटकन नोकरी मिळवता येईल. कॉस्मॉपॉलिटन सिटी या नावाखाली मुबईत मराठी माणसाचा अक्षरशः गळा दाबला जात आहे. म्हैसूरचे कर्नाटक, मद्रासचे तामीळनाडू वगैरे नामातर करताना तेथील राज्यकर्त्यांना केंद्राची मनधरणी करावी लागत नाही, मात्र बॉबेचे मुबई हे नामातर करण्याची मुबईतील मराठी माणसाची एकमुखी मागणी केंद्राकडून उद्दामपणे फेटाळली जाते आणि महाराष्ट्र शासन यावर मूग गिळून बसते तेव्हा या सर्व अन्यायाचा दोष महाराष्ट्र शासनाकडे जातो. मग तेथे सत्तेवर कांग्रेस (इ) असो किंवा जनतापक्ष असो. ह्या पक्षाचे इतर कोणत्याही बाबतीत मतभेद असले तरी मराठी माणसाला चोपण्याच्या बाबतीत त्याचे एकमत होते. लोकसभा, विधानसभा या निवडणुकीत सर्वच अखिल भारतीय पक्षांनी मराठी कार्यकर्त्यांना उमेदवारी देताना मोठ्या प्रमाणात वगळले होते या अन्यायामुळे मराठी माणसाची मते मिळणार नाहीत ही भीती नसल्याने हे पक्ष असा मुजोरपणा करण्यास धजवतात. त्याना काळजी लागलेली असते ती मुबईमधल्या परप्रातीयांच्या मताची. त्यामुळे मराठीमाणसाला दुखवून त्याचे परप्रातीयाशी लांगूलचालन चालू असते. मुबईमध्ये मराठी माणसाची टक्केवारी कमी झालेली आहे म्हणून त्यांना निवडणुकीमध्ये कमी जागा द्यायच्या व त्याचे निलाजरे समर्थन करायचे, ही शुद्ध भोदूगिरी आहे व त्या पाठीमागे एक निश्चित प्रकारचे कटकारस्थान आहे. कारण मुबई ही महाराष्ट्राची राजधानी असल्यामुळे कोणत्याही क्षेत्रात मराठी माणसाला वाव देताना टक्केवारीची भाषा बोलणाऱ्याना मुबईबाहेर हाकलून दिले गेले पाहिजे. तरच महाराष्ट्राच्या राजधानीत मराठी माणसांचा व मराठी अस्मितेचा अपमान करणाऱ्यांना जरब बसू शकेल. आज कर्नाटकाची राजधानी बगलोरमध्ये परप्रांतीयाचे लोढे मुबईप्रमाणे घुसत असतानाही बगलोरवरील कानडीची छाप कायम आहे. तेथे परप्रातीयाची दादागिरी कानडी माणूस सहन करत नाही. कानडी माणसांच्या बाजूने कर्नाटकातील सर्व पक्ष, आपापसातील सर्व मतभेद विसरून, ठामपणे उभे रहातात. बगलोरमध्ये व उर्वरीत कर्नाटकात मराठी व तामिळींची सख्या भरपूर असूनही, कर्नाटक मंत्रिमडळात, महाराष्ट्र मत्रिमडळाप्रमाणे, बाहेरचे, स्थानिक भाषा न येणारे मत्री, जागा अडवून बसलेले नाहीत. महाराष्ट्राचा रौप्यमहोत्सव साजरा होत असताना महाराष्ट्र मंत्रिमंडळात मुबईतील एकही मराठी भाषिक मत्री नसावा ही लज्जास्पद गोष्ट आहे व तिची तुलना कशाशीही होऊ शकणार नाही. महाराष्ट्रातील अनेक नेते मत्रिमडळात (केंद्रीय) असूनही त्यांची इतर राज्याप्रमाणे लॉबी नसल्याने व मराठी भाषिकाबद्दल त्याना तळमळ नसल्याने ते आपल्या बांधवाची बाजू दिल्लीत उचलून धरत नाहीत. जर मुख्यमंत्र्यानीच मुबईतील मराठी भाषिकाला मत्रिमडळात घेण्याकरता ताणून धरले नाही तर मराठी माणसाबद्दल व महाराष्ट्राबद्दल सदैव द्वेषाची भावना बाळगणाऱ्या केंद्रीय नेत्याकडून या बाबतीतील कार्यवाहीची अपेक्षा कशी करता येणार ?

आणि परप्रातीयाच्या घुसखोरीची ही समस्या फक्त मुबईलाच जाणवत नसून मुबईपासून कर्जतपर्यंत व मुबईपासून विरारपर्यंत तिची व्याप्ती वाढली आहे पुणे, नागपूर वगैरे मोठ्या शहरानाही परप्रातीयाची घुसखोरी जाणवत आहे. जसजसे महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यातून उद्योगधदे वाढत जातील तसतसे परप्रातीय मुबईतून त्या भागात जाऊ लागतील व स्थानिक लोकांना निरनिराळ्या समस्या निर्माण करून ठेवतील. आज अर्धेअधिक केरळ मुबई व तिच्या उपनगरात आलेले आहेच. शिवाय तामिळी, तेलगू, कानडी, बंगाली, उत्तरप्रदेशी भय्ये ह्याची सख्या काही कमी नाही. मुबईमध्ये अनधिकृत झोपडपट्ट्याची लागण लावण्यात उत्तरप्रदेशी भय्याचा जास्त हात आहे या परप्रातीयामुळे मुबईतील गुन्हेगारी, गुडगिरी, दरोडेखोरी इतकी वाढली आहे की, दिवसेंदिवस तिला कलकत्त्याप्रमाणे बकाल स्वरूप येत आहे आणि का परप्रातीयाना मुबईबद्दल प्रेम व आत्मीयता फारच कमी आहे. केवळ नोकरी करता आणि धद्याकरता ते मुबईत येतात व पैसे कमवून आपापल्या राज्याची धन करतात. मुंबईमध्ये मोठमोठ्या उद्योगधद्यात मराठी माणसाला परप्रातीयाच्या वशिलेबाजीमुळे नोकऱ्या मिळत नसल्यामुळे, त्याची आर्थिक स्थिती फारच हालाखीची असते. त्यामुळे ते प्रॉपरमुबईत जागा घेऊ शकत नाहीत व त्याना स्वतःची राजधानी असतानाही दूर उपनगरातून लोकलच्या चेंगराचेंगरीतून नोकरी धद्याकरता मुबईत यावे लागते. गिरगाव-

सारख्या मराठी भाषिक जास्त असलेल्या भागातूनही काही कारणामुळे तेथील मराठी भाषिकाना उपनगरात जावे लागत आहे. लोकल्समध्ये जी तुफान गर्दी होते व माणसाना मेंढराप्रमाणे वाईट अवस्थेत प्रवास करावा लागतो त्याला केवळ परप्रातीयाची घुसखोरीच जबाबदार आहे. कारण रोजच्यारोज परप्रातीयाचे लोंढेच्यालोंढे मुबईत येत आहेत; परतु त्याचप्रमाणात (वाढत्या लोकसख्येच्या प्रमाणात) लोकल्सच्या संख्येमध्ये वाढ होत नाही.

## अमराठींचे लोंढे

मुंबईमध्ये औद्योगिकरण सर्वात जास्त भरभराटीस आल्यामुळे भारतात सर्वात जास्त रोजगाराच्या सधी मुबईमध्ये उपलब्ध झाल्या. भारताच्या कानाकोपऱ्यातून नोकरीधदा मिळवण्याकरता परप्रातीयांची मुबईत रीघ लागली. ह्या लोकानी मुबईत येऊन भरमसाठ पैसा कमवला व त्या बदल्यात मुबईला काय दिले ? तर घाण, रोगराई, आणि बजबजपुरी. आज मुबईमध्ये नोकरी, उद्योगधदा ह्या सर्व ठिकाणी परप्रातीयाची मिरासदारी आहे. दुकानदारीचा व्यवसाय गुजराथी लोकानी कॅपचर केला आहे तर हॉटेल व्यवसाय उडप्यानी. टॅक्सीच्या व्यवसायात उत्तरप्रदेशीय भय्ये, शीख व दाक्षिणात्याचा इतका भरणा झाला आहे की, मराठी टॅक्सीचालक अभावानेच आढळतो. मुबईमध्ये निरनिराळ्या राज्यातून परप्रांतीयाचे रोजच्यारोज जे लोंढे यतात, त्या लोकाची राज्यावर वर्गवारी करून त्याच्यासाठी महाराष्ट्र शासनाला जो खर्च करावा लागतो तो शासनाने त्या त्या राज्याकडून व केंद्रशासनाकडून मागावयास हवा. ह्या लोकाना वर्षानुवर्षे पोसण्याचा मक्ता महाराष्ट्र शासनाने घेतला आहे का ? हे लोक मुबईत येतात त्यातील कित्येक अनधिकृत झोपड्या व बाधकामे उभारतात. त्यामुळे मुबई बकाल झाली आहे. आज मुबईत झोपडपट्ट्या व फेरीवाले नसलेले फुटपाथ अभावानेच आढळतील आणि हे सर्व लोक प्रामुख्याने अमराठीच आहेत. हे लोक रहायला पुरेशी जागा नसल्याने सार्वजनिक ठिकाणी घाण करून ठेवतात. त्यामुळे मुबईत आरोग्य नावाची चीजच अस्तित्वात राहिलेली नाही. महापालिका व शासनालाही त्या अनधिकृत झोपडपट्टीवाल्याना पुरेशा सोयी–सवलती पुरवणे परवडण्यासारखे नाही स्वच्छ व सुदर मुबई ही आता केवळ कल्पनेतच राहिलेली आहे परप्रातीयांची घुसखोरी रोखण्याकरता परवानापद्धती सुरू करण्याची वेळ लवकरच महाराष्ट्र शासनावर येईल.

परप्रातातील लोकाच्या लोढ्याला आळा घालणारा कायदा केला तरच मुबईत मराठी भाषिक माणसाचे बहुमत राहील. असे भाकित बऱ्याच वर्षापूर्वी डॉ. बाबासाहेब आबेडकर याना केले होते; परतु त्याबद्दल गभीरपणे विचार करण्याची गरज शासनाला त्यावेळेसही वाटली नाही व आताही वाटत नाही. शिवसेनेसारख्या सघटनेमुळेच मुबईत मराठी माणूस थोडा तरी तग धरून राहिला आहे शिवसेनेने सुरुवातीच्या काळात मुबईवर मराठी माणसाची छाप कायम ठेवण्यात यश मिळवले होते. त्यावेळेस वसतराव नाईक याच्यासारखी मराठीबद्दल अस्मिता असणारी व्यक्ती मुख्यमंत्रीपदी असल्याने शिवसेनेला मराठी माणसाचा आवाज बुलद करता आला. त्यावेळेस शिवसेनेने मुबईवर वर्चस्व राखल्याने परप्रांतीय त्याना टरकून असत. शिवसेनेने सतत आंदोलने उभारून मराठी माणसाचे अनेक प्रश्न मार्गी लावले. मात्र दुर्दैवाने त्यानंतर झालेल्या एकाही मुख्यमंत्र्याने मराठी माणसाबद्दल फारशी आस्था न दाखवल्याने व शिवसेनेच्या धोरणामुळे शिवसेना काही काळ मागे पडत गेली, आणि परप्रातीयाची दादागिरी वाढू लागली. तरीही शिवसेनेनी आपल्या परीने मराठी माणसाचे प्रश्न हाताळत मराठी माणसाला मुबईतून हद्दपार होऊ दिले नाही. शिवसेनेच्या कामगार सेनेने निरनिराळे कारखाने आपल्या नियत्रणाखाली आणून त्यामध्ये मराठी माणसांना रोजगाराच्या जास्तीत जास्त सधी उपलब्ध करून दिल्या. त्याचप्रमाणे निरनिराळ्या सस्थात स्थानिय लोकाधिकार समितीची स्थापना करून मराठी माणसाना ८०% जागा मिळवून देण्याकरता यशस्वी प्रयत्न केले. नुकत्याच झालेल्या महानगरपालिका निवडणुकीच्या अखिल भारतीय पक्षांच्या उमेदवाराची यादी पाहिली असता फारच थोड्या मराठी कार्यकर्त्यांना उमेदवारी देण्यात आली होती म्हणूनच निदान महानगरपालिका निवडणुकीत तरी मराठी लोकानी अखिल भारतीय पक्ष बाजूला ठेवून एक गठ्ठा शिवसेनेला मते द्यावयास हवीत असे वाटले.

## दुसरे चॅनेल तोटा ?

दूरदर्शनवरील कार्यक्रमाचेच उदाहरण घ्या. खरे पहाता कलकत्ता, मद्राससारख्या ठिकाणी जवळजवळ ८०% कार्यक्रम स्थानिक भाषेतून होतात. परंतु मुबईत ही गोष्ट पहावयास मिळत नाही. प्रत्येक मराठी कार्यक्रमाला पर्यायी असा गुजराथी, हिंदी कार्यक्रम आहेच. साधी आठवड्याची साप्ताहिकीसुद्धा मराठीतून सागण्यात येत नाही. दर वेळेस आयत्या वेळी मराठी कार्यक्रम रद्द करून एखादा राष्ट्रीय कार्यक्रम मराठी माणसाच्या बोकाडी मारण्यात येतो. राष्ट्रीय कार्यक्रमाच्या वेळासुद्धा मराठी कार्यक्रम विचारात न घेता वाटेल तशा बदलण्यात येतात. राष्ट्रीय कार्यक्रमातील चित्रमाला कार्यक्रमात मराठी चित्रपटगीताची कधीच दखल घेण्यात येत नाही ह्या सर्व प्रकार चीड आणणारा असून मराठी माणसाच्या दुबळेपणामुळेच अशी दडपेगिरी करून करण्यात येते. मुबई मराठी दूरदर्शन केन्द्रावरही मराठीद्वेष्ट्या अधिकाऱ्याची खोगीरभरती झालेली असल्याने मराठीचा व वेळ पडल्यास महाराष्ट्र शासनाचाही अवमान करण्यास हे मुजोर अधिकारी घाबरत नाहीत. कारण त्यांना माहित असते की त्याचे मराठी माणसाच्या राजधानीत कोणी वाकडे करू शकणार नाही. दूरदर्शनचे जे नवीन चॅनेल सुरू होत आहे, त्यावर मराठी कार्यक्रम दाखवणार असल्याने, मूळ चॅनेलवरील मराठी कार्यक्रम आपोआपच कमी होतील व त्याचा फटका मुबईपासून दूरवर राहाणाऱ्या मराठी माणसासच बसणार आहे कारण ह्या नव्या चॅनेलची क्षमता कमी असल्याने दूरवर राहणाऱ्या मराठी माणसाला नव्या चॅनेलवरील कार्यक्रम बघत येणार नाहीत व मूळ चॅनेलवरील मराठी कार्यक्रम कमी झाल्याने भीक नको पण कुत्रे आवर अशी पाळी मराठी माणसावर येणार आहे. या बाबतीत काही फरक झाल्यास तो स्वागतार्हच होईल.

राष्ट्रभाषा हिंदीचा प्रसार करण्याच्या नावाखाली प्रादेशिक भाषामध्ये सर्वात जास्त गळचेपी कोणाची होत असेल तर ती मराठीचीच रेल्वेसारख्या राष्ट्रीय उद्योगात हिंदीला प्रमाणापेक्षा जास्त महत्व महाराष्ट्रात देण्यात आले आहे. मुबईहून बाहेरगावी जाणाऱ्या लाब

क्रिया, त्यांचे त्याज्य पदार्थ, त्यातील मृत्यू पावणाऱ्या जीवांची कुजण्याची क्रिया, जैविक विघटन, प्रकाश संश्लेषण प्रक्रिया यासारख्या जैविक क्रिया तर विशेष महत्त्वाच्या आहेत. सागरी सेंद्रिय रसायनशास्त्र ही दिवसेंदिवस प्रचंड वेगाने विकसित होणारी शाखा आहे. मानवी रक्त ज्याप्रमाणे प्रोटिन्स, ॲमिनो, ॲसिड्स, कार्बोहैड्रेटस, व्हिटॅमिन्स, हार्मोन्स व वायूंची वाहतूक करते. त्याचप्रमाणे सागरी जल असंख्य सेंद्रिय रसायनांची वाहतूक करते सागराच्या तळापासून नत्र, स्फुरद, सिलिकॉन व इतर अनेक रासायनिक पदार्थ सागराच्या इतर भागामध्ये पसरवण्याची एक यंत्रणाच महासागरामध्ये कार्यरत असते, या यंत्रणेला 'अपवेलिंग' असे म्हणतात. ही क्रिया प्रभावी असलेल्या भागात सागरजलाची सुपिकता जास्त असते. या सर्व प्रक्रियांचा अभ्यास सागरी रसायनशास्त्रात केला जातो.

### स्वतंत्र संशोधन केंद्रे

तांत्रिकदृष्ट्या प्रगत मानवी समाजाने असंख्य प्रकारचा केरकचरा, सांडपाणी व टाकाऊ पदार्थ फेकण्याची समुद्र ही हक्काची जागा मानली आहे व त्यामुळेच सागरांच्या प्रदूषणाची समस्या निर्माण झाली आहे. सागरांच्या मोठ्या प्रमाणावर होणाऱ्या प्रदूषणामुळे सागरांची रासायनिक घटना बदलण्याची भीती निर्माण झाली आहे. अनेक सागरी जीवांचा नाश होत आहे व सागरी जैविक श्रृंखलेचा भंग होत आहे. सागरी रसायनशास्त्रात सागरांच्या प्रदूषणाच्या अभ्यासाला अग्रक्रम दिला जात आहे. मोटारीच्या एक्झॉस्ट पाईपमधून बाहेर पडणाऱ्या धुरामध्ये टेट्रा–इथील–लेड TEL हा अत्यंत विषारी पदार्थ असतो. वातावरणात मिसळणारा हा पदार्थ पावसामुळे शेवटी समुद्रात जातो. त्यामुळे गेल्या २० वर्षात किनाऱ्यालगतच्या विभागात TEL चे पर्यायाने शिशाचे प्रमाण दहा पटीने वाढले आहे. त्याचा सागरी जीवसृष्टीवर होणारा नेमका परिणाम शोधून काढणे आवश्यक आहे. तेलवाहू जहाजांचे अपघात व समुद्रातील तेलविहिरींचे अपघात यामुळे समुद्रात सांडणाऱ्या पेट्रोलियमचे प्रमाण वाढत चालले आहे. तेलाचा सागरी पृष्ठावर पसरणारा तवंग हा सागर व वातावरण यामधील औष्णिक संतुलनावर परिणाम करतो. अशा प्रकारच्या सागरी पर्यावरणावर प्रतिकूल परिणाम करणाऱ्या प्रक्रियांचा अभ्यास सागरी रसायन शास्त्रात महत्त्वाचा आहे.

औद्योगिकरणामुळे प्रदुषित झालेल्या वातावरणाचा सागरपृष्ठाशी संपर्क आल्यामुळे होणारे परिणाम तसेच सागरांच्या तळाशी होणारे ज्वालामुखी व गाळाचे थर साचण्याच्या क्रिया ही संशोधनाची स्वतंत्र क्षेत्रे आहेत. अशा प्रक्रियामुळे होणारे रेणूंचे विसरण, त्यांचे जीवाणूवर होणारे परिणाम ही या शास्त्रातील नवी क्षेत्रे आहेत. सागरतळावरील निक्षेपण व इतर प्रक्रियांचा अभ्यास करणारे सेंद्रिय भू–रसायनशास्त्र ही नवी शाखा विस्तार पावत आहे.

समुद्रामधून निरनिराळी रसायने मिळविण्याचे तंत्र विकसित करणे व अशा रासायनिक पदार्थांची उपलब्धता निश्चित करणे हेसुद्धा एक महत्त्वाचे क्षेत्र आहे. सागरामध्ये सुमारे ८४ मूलद्रव्ये असल्याचे सिद्ध झाले आहे, हे यापूर्वी स्पष्ट केले आहे. त्यामध्ये क्लोरीन व सोडियम यांचे प्रमाण सर्वात जास्त असते तर हेलियम व सोने यांचे प्रमाण सर्वात कमी. इतर ८० मूलद्रव्यांचे प्रमाण यामध्ये असते. (एक घन किलोमीटर सागरी पाण्यात २२ कोटी टन क्लोरीन आणि १२ कोटी टन सोडियम असते. हेलियम व सोने यांचे प्रमाण अनुक्रमे ७ किलोग्रॅम व ५ किलोग्रॅम इतके असते.) या प्रमाणावरून सागरी रसायनशास्त्रापुढे केवढे आव्हान आहे हे लक्षात येईल. कारण मानवाला भविष्यकाळात या सर्व द्रव्यासाठी सागरावर अवलंबून रहावे लागणार आहे. सागरातील विविध रासायनिक घटकांचे प्रमाण निश्चित करण्यासाठी सोयिस्कर पद्धतीचा शोध लावणे हेसुद्धा या शास्त्रामधील संशोधनाचे नवे क्षेत्र आहे. सागरजल किंवा सागरातील कोणताही रासायनिक पदार्थ सागरी पर्यावरणातून दूर प्रयोगशाळेत न नेता खुद्द त्याच्या पर्यावरणामध्येच म्हणजेच सागरामध्येच त्याचे पृथक्करण अथवा विश्लेषण करता आले तर त्यामुळे संशोधनात मोठीच भर पडणार आहे. त्यादृष्टीने योग्य संशोधन पद्धतीचा शोध घेणे आवश्यक आहे. कदाचित त्यासाठी दूर विश्लेषणासारख्या अत्यंत प्रगत तंत्राचा वापर करावा लागेल.

भारतामध्ये मात्र सागर विज्ञानाची ही अत्यंत महत्त्वाची शाखा प्राथमिक अवस्थेत आहे. सागरी किनाऱ्यालगतच्या फारच थोड्या विद्यापीठात पदव्युत्तर अभ्यासक्रमात या विषयाचा समावेश करण्यात आला आहे. त्यादृष्टीने कोचीन, अन्नमलाई, आंध्र आणि बहरामपूर विद्यापीठांनी सुरू केलेले कार्य प्रशंसनीय आहे. सागरी रसायनशास्त्र आणि सागरीशास्त्राशी संलग्न इतर कोणत्याही शास्त्राच्या अभ्यासासाठी प्रचंड प्रमाणावर खर्च करावा लागतो. हे महागडे शिक्षण व संशोधन केवळ विद्यापीठांना शक्य नाही. त्यासाठी शासकीय यंत्रणेचा उपयोग आवश्यक आहे. त्यादृष्टीने एका बाजूला डिपार्टमेंट ऑफ सायन्स अँड टेक्नॉलॉजी, कौन्सिल ऑफ सायंटिफिक अँड इंडस्ट्रियल रिसर्च, नॅशनल इन्स्टिटट्यूट ऑफ ओशनोग्राफी, सेंट्रल सॉल्ट अँड मरीन केमिकल रिसर्च इन्स्टिटट्यूट, डिफेन्स सायन्स एस्टॅब्लिशमेंट्स व डिपार्टमेंट ऑफ ओशन डेव्हलपमेंट यासारख्या शासकीय संस्था व दुसऱ्या बाजूला विद्यापीठ अनुदान मंडळ व संबंधित विद्यापीठे यामध्ये संपर्क प्रस्थापित होऊन एकत्रित प्रयत्नांनी हे आव्हान पेलण्याची आवश्यकता आहे. □



मुंबई महापालिका निवडणुकीत शिवसेनेचा दणदणीत विजय झाला. भारतातील एका मोठ्या शहराचा कारभार शिवसेनेच्या हाती येत आहे. गल्याच वर्षी शिवसेनेने 'प्रॅक्टिकल सोशॅलिजम' या विचाराचा अधिकृत स्वीकार केलेला होता. हा विचार काय आहे? नवाकाळचे संपादक निळकंठ खाडीलकर यांनी या मुलाखतीत हे सविस्तरपणे मांडलं आहे.

# किमान गरजांची हमी, समाजवाद व लोकशाही हीच आमची त्रिसूत्री !

मुलाखत : सुरेश नगर्सेकर

**प्रश्न :** प्रॅक्टिकल सोशॅलिझम अर्थात व्यवहारी समाजवाद हा शब्दप्रयोग तुम्हाला कसा सुचला ?

**नीलकंठ खाडिलकर :** 'प्रॅक्टिकल सोशॅलिझम' हा शब्दप्रयोग अचानक सुचला आणि फार आनंद झाला. समाजवाद–साम्यवाद अशा विचारधारांचे वाचन–मनन अनेक वर्षे केले होते. त्याबाबत जे कोडे होते ते उलगडल्यानंतर, जे उमजले होते ते 'प्रॅक्टिकल सोशॅलिझम' या शब्दांनी अचूक टिपले याचा हा आनंद होता.

वास्तविक हे दोनही शब्द इंग्रजी आहेत, पण त्यांचे भाषांतर केल्यास भारतातील विभिन्न भाषांत वेगवेगळे होईल. त्याऐवजी 'प्रॅक्टिकल सोशॅलिझम' असा शब्दप्रयोग वापरला तर भारतात सर्वत्र समान नाव राहील आणि समजेल. कारण दोनही शब्द वेगवेगळ्या भाषिकांना परिचितच आहेत. जे सांगायचे आहे ते या शब्दांनी पकडले आहे. शिवाय नावापासूनच कर्मठपणाला नकार आणि प्रॅक्टिकल दृष्टिकोनाचा स्वीकार सुरू झाला, नाही का ?

## स्वप्नाळूपणापासून फारकत

**प्रश्न :** तुम्हाला जे कोडे होते ते उलगडले असे म्हणालात. पण कोडे कोणते होते ?

**नीलकंठ खाडिलकर :** त्याचे विवेचन 'प्रॅक्टिकल सोशॅलिझम' या पुस्तकात विस्ताराने केले असून थोडक्यातही सांगता येईल

महान समाजवादी विचारवंतांनी आपल्या विचाराची मांडणी फार तर्कशुद्ध केली आहे. कुठे फट कशी ती सापडणार नाही त्यांच्या युक्तिवादाची बांधणी इतकी चिरेबंद असते की, अशा दोन विचारवंतांचे परस्परविरोधी मते मांडणारे ग्रंथ जर सामान्य माणसाने वाचले तर त्याला दोघांचेही पटते ! पण त्यांच्या बिनतोड गणिताप्रमाणे प्रत्यक्षात मात्र घडत नाही.

त्याचे कारण असे की, या तत्त्ववेत्त्यांनी गणिती सिद्धान्त मानवी जीवनाविषयी मांडले आहेत; पण मानव एखाद्या जड वस्तुप्रमाणे गणितात बसत नाही. पाण्याचे तपमान १०० अंश सेंटिग्रेडवर नेले तर त्याला उकळी फुटणारच आणि तपमान शून्याखाली ४ अंश नेले तर पाण्याचा बर्फ होणारच मानवी मनाची प्रतिक्रिया इतकी नियमबद्ध होऊ शकत नाही. समाजवादी विचारवंतांनी काम-क्रोध-लोभ-मद-मत्सर-मोह हे सहा विकार-षड्रिपु हिशेबात न घेता मांडणी केली आहे गौतम बुद्ध जिला तृष्णा म्हणतात त्या तृष्णेची दखल न घेता समाजवादी तत्त्वज्ञान्यांनी मानवाचे गणित सोडविले आहे तृष्णेचा मानवी बुद्धीवर आणि त्यामुळे आचरणावर प्रभाव पडतो. माणसाला कळले तरी वळत नाही ते तृष्णेमुळेच. मार्क ट्वेनचा एक विनोद फारच विदारक आहे. तो म्हणाला, 'तुम्ही जर रस्त्यावरील उपेक्षित कुत्रा घरी आणलात आणि त्याचे पालनपोषण केलेत तर तो तुम्हाला चावणार नाही ! अशी हमी माणसाबाबत देता येणार नाही हा मुख्य फरक आहे !' विकाराचा माणसाच्या बुद्धीवरील प्रभाव या विनोदात मार्मिकपणे सुचविला आहे.

मानवी षड्रिपुंची दखल न घेतल्यामुळेच समाजवादी विचारवंतांच्या विचारांनी स्वप्नाळू आदर्शवादी वळणे घेतली. प्रॅक्टिकल सोशॅलिझमचा विचार मानवाचे षड्विकार आणि मानवाचा अपुरेपणा याचे पूर्ण भान ठेवतो. यामुळे हवेत तरंगत न जाता त्याचे पाय जमिनीवरच भक्कम रहातात मानवी विकारांचे नियंत्रण करून त्यांना विधायक वळण देणारी. आणि मानवी अपुरेपणाची दखल घेणारी ही विचारसरणी आहे या विचारप्रणालीत लोकांना भयभीत करणारा भोंगळपणाही नाही भारतीय भूमीत निश्चितपणे रुजेल व उगवेल असा हा अस्सल भारतीय, निखळ राष्ट्रवादी आणि स्वप्नाळूपणाला थारा न देणारा सुस्पष्ट समाजवादी विचार आहे !

## नवहिंदुत्ववादाचा आरोप मतलबी

**प्रश्न :** प्रॅक्टिकल सोशॅलिझम म्हणजे नवहिंदुत्ववाद आहे या आरोपाबद्दल तुमचे काय म्हणणे आहे ?

**नीलकंठ खाडिलकर :** प्रथम उपेक्षा, नंतर बदनामी आणि अखेर प्रत्यक्ष हल्ले हे तंत्रच असते प्रॅक्टिकल सोशॅलिझमच्या उपेक्षेचा प्रयत्न फसलाच नाही तर अगदी भाजी पूर्वी 'मड्ढद' ज्याप्रमाणे वाळीत टाकत असत त्याप्रमाणे शेठजींनी ठेवलेल्या विशिष्ट संपादकांनी आपल्या वृत्तपत्रात 'प्रॅक्टिकल सोशॅलिझम'चे नावही येता कामा नये अशा सूचना दिल्या. मतलबी पुढाऱ्यांनीही कटाक्षाने उल्लेख टाळला; पण यामुळे 'प्रॅक्टिकल सोशॅलिझम'च्या अस्सलपणाची लोकांना आणखी खात्री पटली आणि प्रसार अधिकच जोरात झाला. याच वेळी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचा 'प्रथम समाजवाद आणि त्यासमवेत संसदीय लोकशाही' हा ज्वलंत विचार डॉ. आंबेडकर व्याख्यानमालेतील एक पुष्प गुंफताना मी लोकांसमोर आणला. हा विचार गेल्या चाळीस वर्षांत पद्धतशीर उपेक्षेने कसा मारला गेला तेही स्पष्ट केले आणि हाच विचार प्रॅक्टिकल सोशॅलिझमचा अग्रदूत कसा ते साधार मांडले. त्यामागोमाग पँथर नेते भाई संगारे यांनी रवींद्र बागडे यांच्यासह 'प्रॅक्टिकल सोशॅलिझम फ्रण्ट'ची स्थापना केली. यानंतर नवहिंदुत्ववादाचा आरोप सुरू झाला !

या आरोपाचा आधार कोणता ? तर 'प्रॅक्टिकल सोशॅलिझम'-च्या पुस्तकात ही विचारसरणी स्वीकारण्याचे हिंदूंना खास आवाहन केले आहे या देशात हिंदू बहुसंख्य आहेत आणि हिंदूंना खास आवाहन केलेच पाहिजे. विशेषतः लोकशाहीत कोणताही विचार बहु-

सत्यांकांना पटविल्याशिवाय अंमलात कसा आणणार? डॉ. बाबासाहेब आंबेडकर यानी पंडित नेहरूना व कॉंग्रेसला सतत आवाहन केले; पण म्हणून त्यांना कुणी नेहरूवादी किंवा कॉंग्रेसवादी ठरविले नाही. त्यांनी प्रकृतीकडे दुर्लक्ष करून हिंदू कोड विधेयक तयार केले आणि पुराणग्रंथाचा अभ्यास करून सनातनी हिंदूना सुधारणेचे आवाहन केले; पण त्याना कुणी नवहिंदुत्ववादी म्हटले नाही. जर प्रॅक्टिकल सोशॅलिझमचा अमल पाकिस्तानात करावयाचा असेल तर खास आवाहन करून मुस्लिमांना पटवून द्यावे लागेल की, सनातनी धर्मांध नेते सामान्य जनतेला दारिद्र्यात आणि अज्ञानात डाबण्यासाठी धर्माचा मतलबी अर्थ सांगत आहेत आणि फसवणूक करीत आहेत.

शिवाय 'प्रॅक्टिकल सोशॅलिझम' पुस्तकात फक्त हिंदूना आवाहन आहे असे भासविणे साफ खोटेपणाचे आहे. त्यात स्पष्ट म्हटले आहे की, 'समाजवाद दलिताचे प्रश्न सोडविलच; पण दलितानीच नेतृत्व केले तर भारताचे नेतृत्व करण्याची अशक्य वाटणारी संधी त्याना मिळू शकेल.' दुसऱ्या ठिकाणी म्हटले आहे की, 'आजचे नेते भारतात जातीयता आणि धार्मिक वितुष्ट निवडणूकी जिंकण्यासाठी पोसत आहेत; पण समाजवादी नेत्याना सर्वात प्रखर विरोध जातीयतेलाच करावा लागेल.' आणखी एक प्रतिपादन पहा– 'समाजवाद हा मुस्लिम स्त्रियाच्या, ख्रिश्चनाच्या विरोधासाठी नसून, त्याची पुराणमतवादी धर्म मार्थेफिरूच्या कचाट्यातून मुक्तता करण्यासाठी आणि त्याचीदेखील अफाट प्रगती करण्यासाठी आहे.'

## धर्म घरात व प्रार्थनास्थळात मर्यादित करा

'धर्म घरात आणि प्रार्थनास्थळात मर्यादित करा' ही प्रॅक्टिकल सोशॅलिझमची घोषणा आहे. प्रॅक्टिकल सोशॅलिझमच्या कार्यक्रमातील ते महत्त्वाचे कलम आहे. राजकारणाने धर्मात हस्तक्षेप करता कामा नये आणि विकासाच्या राजकारणाच्या आड येणारे धर्मवेड खपवून घेता कामा नये अशी स्वच्छ व स्पष्ट भूमिका आहे त्यानुसार 'प्रॅक्टिकल सोशॅलिझम' च्या पुस्तकात कार्यक्रमाच्या सहाव्या कलमात नि.संदिग्धपणे म्हटले आहे– 'हिंदू समाजातील पुजारी आणि मुस्लिमातील मुल्ला-मौलवी किंवा अन्य धर्मप्रमुख यानी स्वत.चे प्रस्थ माजविण्यासाठी धर्माच्या नावाखाली समतेला हरताळ फासणारे जे अन्यायकारक नियम केले आहेत, त्याचा मुलाहिजा ठेवला जाणार नाही– समतेविरुद्ध किंवा राष्ट्रीय धोरणाविरुद्ध कोणताही धार्मिक नियम सांगणे हा गंभीर मानला जाईल– मात्र घरापुरता व प्रार्थनास्थळापुरता धर्म प्रत्येकाला पाळता येईल हे ठासून सांगितले पाहिजे.'

या बाबतीत प्रॅक्टिकल सोशॅलिझमची विचारसरणी रोखठोक आहे, आणि त्यामुळेच मुंबई महापालिकेचे वॉर्ड ऑफीसर जी. ए. खैरनार यानी फूटपाथवरील बेकायदा धर्मस्थळे तोडताच फक्त प्रॅक्टिकल सोशॅलिझम फ्रण्टनेच त्याचा ताबडतोब दणदणीत जाहीर सत्कार केला व पाठिंबा दिला. तोडलेल्या धर्मस्थळात एक दर्गा, तीन क्रॉस आणि हिंदूची अनेक देवालये होती. सत्कार समारंभात स्पष्टपणे सांगण्यात आले की, 'कोणत्या धर्माची बेकायदा धर्मस्थळे तोडली यान्याशी आम्हाला कर्तव्य नाही. रस्त्यावरील बेकायदा धर्मस्थळे तोडली म्हणून आम्ही सत्कार करीत आहोत'

## एकजातीय राजकारण म्हणजे डिपॉझिट जप्त

प्रश्न – राजकारणाचा पाया व्यापकच असला पाहिजे असे तुम्ही आग्रहाने का सांगत असता?

नीलकंठ खाडिलकर – आज भारतात क्रांतिकारक बदल हवा आहे. एकाच जातीचे आणि त्यातही गटबाज राजकारण करून असा बदल घडविता येणार नाही. एकजातीय राजकारणामुळे निवडणुकीत डिपॉझिट जप्त होते याचा यथेच्छ अनुभव आला आहे. एका धर्माचे राजकारणसुद्धा चालत नाही, तिथे निव्वळ जातीचे काय होणार? अशा राजकारणाने तमाम जनतेची अन्न–वस्त्र–निवारा–शिक्षण-रोजगार औषध उपचार याची किमान गरज पूर्ण करता येत नाही. जनतेचे मूलभूत प्रश्न सुटण्याऐवजी समाजात जाती-धर्माचे विषारी वितुष्ट माजते आणि गरीब जनता भरडली जाऊन फक्त पुढाऱ्याचे प्रश्न सुटतात. स्वतःचे प्रश्न सोडवून घेतलेले आणि घेत असलेले डझनावारी एकजातीय गटबाज पुढारी आहेत, पण ते काडीमात्र बदल घडवू शकत नाहीत. कारण डबक्यात राहून समुद्राचा स्वामी होता येत नाही आणि अर्थातच राजकीय–आर्थिक सामाजिक रचना बदलता येत नाही. प्रॅक्टिकल सोशॅलिझम अशी जाणीव करून देत आहे की एक टक्का वर्गाची आज चंगळ सुरू असून, ९९ टक्के लोकाना लुटून ही लयलूट चालली आहे. म्हणून क्रांतिकारक समाजवादी कार्यक्रमावर ९९ टक्के लोकाची एकजुट बांधणे हाच मूलभूत बदल घडविण्याचा एकमेव मार्ग आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना 'महारांचे नेते' ठरविणे जितके चुकीचे आणि मतलबी तितकेच प्रॅक्टिकल सोशॅलिझमच्या अशा क्रांतिकारक व्यापक विचारावर नवहिंदुत्ववादाचा शिक्का मारणे चुकीचे आणि मतलबी आहे.

धर्मांधता आणि जातीयता याच्यावर प्रॅक्टिकल सोशॅलिझम हा प्रहारच आहे. पाणी आणि अग्नी ज्याप्रमाणे एकत्र नांदू शकत नाहीत त्याप्रमाणे प्रॅक्टिकल सोशॅलिझम आणि जातीयता एकत्र राहू शकत नाहीत. हा कार्यक्रम जातीयता मुळापासून तोडू पहातो.

सध्याच्या राजकीय, आर्थिक आणि सामाजिक व्यवस्थेत जातीयता जोपासली जाणार. लोकसभेपासून ग्रामपचायतीच्या निवडणुकीपर्यंत जात पाहून उमेदवार उभे केले जातात आणि जातीय प्रचार करीतच मते मागितली जातात. एरवीसुद्धा पुढारीपणासाठी जातीचाच वापर केला जातो आणि लोकाचे भले न करताही निवडून येण्यासाठी जातीयताच भडकविली जाते.

घरात डास फार झाले तर घरातील डास मारून डास संपत नाहीत. घराभोवतीची गटारे किंवा दलदल स्वच्छ केली तरच डासाची निर्मिती थांबून घरातील डास नाहीसे होतात. म्हणून प्रॅक्टिकल सोशॅलिझम जातीयता जोपासणाऱ्या विषमतेच्या आणि एक टक्का वर्गाच्या हुकूमशाही व्यवस्थेवर हल्ला करीत आहे. ही अन्याय करणारी व्यवस्था म्हणजे दलदल व दुर्गंधी असून ती दूर केल्यानेच जातीयता ढासळत जाईल. निव्वळ शोभेच्या भाषणानी आणि ठरावानी जातीयतेला ओरखडासुद्धा जात नाही. सभोवताली दुर्गंधी असताना व्यासपीठावर अत्तरे शिंपडून काय उपयोग?

प्रश्न – तुम्ही सोविएत रशियाची स्तुती करता याबद्दल काहीजणांचा आक्षेप आहे.

नीलकंठ खाडिलकर – या आक्षेपाला माझे उत्तर असे की, एकदा

नव्हे तर दहादा स्तुती करीन. स्तुती का करतो ते नीट समजावून द्या.

भारतात साठ कोटी लोक दारिद्र्य रेषेखाली आहेत. त्याने जीवन कसे जाते ? कोणत्या धडपडीत संपते ?

आईबाप गरीब असतात, पण आपल्यासारखे दु:ख आपल्या मुलाला भोगावे लागू नये म्हणून दिवसरात्र काबाडकष्ट करतात. स्वत: उपाशी रहातात आणि मुलाला सकस अन्न देतात.

मुलगा तीन वर्षांचा होताच ते एका नामांकित किंडरगार्टनमध्ये मुलाचे नाव घालायला धावतात. त्याला छानशी पॅंटशर्ट आणि लहानसे बूट-मोजे घालून नेतात पण किंडर गार्टनमध्ये कळते की, मुलाचे नाव मूल जन्मल्याबरोबरच नोंदावे लागते ! शिवाय डोनेशनची कुवत हवी तर प्रवेश मिळतो. मग आईबाप तो नाद सोडून मुलाला एका बालवाडीत घालतात, बालवाडी संपल्यावर शाळेत पाठवितात. पुस्तके-वह्या-सहली सारा खर्च करीत रहातात. अधिकाधिक राबत रहातात.

दहाजणात एकादे कुटुंब त्यातल्या त्यात सुदैवी असते. मुलगा नीट अभ्यास करतो. आईबाप घरी त्याला शिकवू शकत नसले तरी मुलगा शाळेत मागे पडत नाही. किती तरी मुलांना शाळेत काय शिकवितात ते समजत नाही, घरीही कुणी शिकवू शकत नाही आणि मुले बिघडायला कधी वेळच लागत नाही. पण हे कुटुंब त्यातल्या त्यात भाग्यवान आहे ! हा मुलगा शिकतो. शेवटी एस. एस. सी. उत्तीर्ण होतो.

## असेच चालते आणि संपते

मुलगा एस. एस. सी ची गुणपत्रिका आणायला धावतो आणि बाप कॉलेजसमोरच्या प्रवेशाच्या रांगेत जाऊन नंबर धरतो. मुलाला एकदाचा प्रवेश मिळतो. मग तो बारावीच्या परीक्षेत भरपूर गुण मिळवून डॉक्टर किंवा इंजिनियर व्हायचे ठरवितो. अभ्यासात काहीही कसूर करीत नाही. वर्गातील बड्यांची मुले टिंगलटवाळी नि मौजमजा करीत असतात; पण तो कधी त्यात नसतो. या बड्यांच्या मुलांना परीक्षेचे पेपरच मिळतात आणि कमी अभ्यास करूनही ही मुले त्याला मागे टाकतात. ज्यांना कमी गुण मिळतात ते कॅपिटेशन फी देऊन प्रवेश मिळवितात. त्याचे स्वप्न विरते. मग धीर धरून तो पदवी मिळवितो आणि नोकरीच्या शोधात फिरत रहातो. शेवटी दोन वर्षांनी नोकरी मिळते.

मग पैसा साठवत रहातो व एक दिवस ब्लॉक घ्यायचे ठरवितो. आईबापांना उपनगरात ब्लॉकमध्ये न्यायचे अशी त्याची इच्छा असते. पण आईबाप अतिश्रमाने फार आजारी होतात. ब्लॉकसाठी साठवलेले पैसे त्यांच्या आजारपणातच तो खर्च करतो, पण दोघेही सोडून जातात. धीर धरून तो पुन: बचत करतो. पंचेचाळीसाव्या वर्षी वाढत्या किंमतीत ब्लॉक घेतो. लग्न होऊन त्याला चार मुले झालेली असतात आणि त्यांच्यासाठी तो व त्याची बायको राबत असतात.

ब्लॉक घेऊन तो रोज लोकलच्या अफाट गर्दीतून लोंबकळत नोकरीसाठी येजा करीत असतो. या धकाधकीच्या आजवरच्या धावपळीचा नकळत परिणाम झालेलाच असतो. एक दिवस स्टेशनवरच त्याला घेरी येते व गंभीर आजारपण चालू होते. हॉस्पिटलात प्रवेश मिळतो, पण औषधे विकत आणायला त्यालाच सांगितले जाते. त्यासाठी शेकडो रुपये लागतात. अखेर ब्लॉक विकून तो उपचार करून घेतो आणि मुलांचे शिक्षण पुरे करतो. पण मुलांनी ब्लॉक घेतलेला पहाण्यापूर्वीच तो व त्याची बायको मरण पावतात ! त्यांच्यामागे असतात त्यांची मुले व त्या मुलांचे आयुष्य आता आईबापाच्याच वाटेने चाललेले असते ! कारण सामान्यजनाचे जीवन असेच चालते आणि संपते ! त्यात बदल काही होत नाही.

प्रश्न :— वा ! ही तर कादंबरीसाठी किंवा कलात्मक चित्रपटासाठी अप्रतिम कथा झाली !

नीलकंठ खाडीलकर :— तुम्ही साहित्यिक आहात. तेव्हा दारिद्र्याच्या वर्तुळात सापडलेले आणि त्यातून सहसा बाहेर पडू न शकणारे हे जीवन जरूर रंगवा ! भारतात कोट्यावधी सामान्य माणसांचे हेच आयुष्य आहे. अन्न-वस्त्र-निवारा-शिक्षण-नोकरी-औषध उपचार यासाठी रात्रंदिन काबाडकष्ट करीत रहायचे आणि तरीही केवळ किमान गरजांशीही लपंडाव खेळायचा !

**भारतात अन्न-वस्त्र-निवारा-शिक्षण-नोकरी-औषध उपचार या किमान गरजांसाठी जन्मभर धडपड चालते, पण रशियात मुलाला जन्माला येताच जन्मसिद्ध हक्क म्हणून या गरजा प्राप्त होतात. म्हणजे तुमचे जिथे जीवन संपते तिथून रशियातील जीवन सुरू होते !**

सोविएत रशियाची स्तुती यासाठी केलीच पाहिजे मूल कोणाच्या पोटी जन्माला आले, त्यावर मुलाचे भवितव्य बिलकूल अवलंबून नाही अशी ही समाजव्यवस्था आहे. समान आणि मोफत शिक्षण, पदवी मिळण्यापूर्वीच एक वर्ष अगोदर तुमच्या पसंतीच्या नोकरीवर नेमणूक आणि रूजू होईतो निम्मा पगार, उत्पन्नाच्या सहा टक्के भाड्यात रहाण्यासाठी स्वतंत्र ब्लॉक, मोफत व उत्तम औषध उपचार हे सारे हक्काने मिळते यापैकी कोणतीही गोष्ट आईबापावर अवलंबून नाही !

म्हणून मी सोविएत रशियाची मनापासून स्तुती करतो. एकदा नव्हे तर दहादा करतो

## भारताची वैशिष्ठ्ये लक्षात घेणारी विचारधारा

प्रश्न : भारतात रशियन मॉडेल आणावे असे तुम्ही म्हणता का ?

नीलकंठ खाडिलकर :— बिलकूल नाही ! प्रत्येक देशाची खास वैशिष्ठ्ये असतात आणि त्यानुसारच त्या त्या देशात जडणघडण करावी लागते. मात्र अन्न-वस्त्र-निवारा-शिक्षण-नोकरी-औषध उपचार याचा हक्क जन्मत:च प्राप्त होणे हेच उद्दिष्ट भारतीय जडणघडणीचे असले पाहिजे.

भारतात ब्रिटिशांचे राज्य दीडशे वर्षे होते. ब्रिटिशांनी केलेले कायदेकानू आजही भारतात अंमलात आहेत त्यांचीच लोकशाही समाजवादाची पद्धती आपण उचलली व स्वीकारली ब्रिटन आणि भारत याच्यात कसलेही साधर्म्य नाही, पण त्याचीच रचना आपण सहीसही उचलली. त्याचा परिणाम असा झाला की, आज भारतात खरीखुरी लोकशाहीही नाही आणि समाजवादही नाही. एक चित्रकार होता. त्याने फ्रेममध्ये एकदा कोरा कागद लावून फ्रेम भिंतीवर लटकावली. लोक विचारीत की हे कसले चित्र ? तो म्हणायचा,

'गाय व गवत याचे हे चित्र आहे !'

'पण गवत कुठे आहे ?'

'गायीने गवत खाल्ले !'

'आणि गाय कुठे आहे ?'

'कमाल आहे ! गवत खाल्ल्यावर गाय तिथेच कशाला राहील ?'

आजचा लोकशाही समाजवाद म्हणजे असेच कोरे चित्र आहे. लोकशाही नाही आणि समाजवादही नाही ! लोकशाहीतून भांडवलशाही, भांडवलशाहीतून भ्रष्टाचार, त्यातून मक्तेदार भांडवलदार–सत्ताधारी-नोकरशहा-गुंड-स्मगलर यांच्या लुटारू टोळ्या निर्माण झाल्या आणि या एक टक्का वर्गाची भोगशाही व हुकुमशाही आज मोकाट चालली आहे.

भारतासाठी प्रथम घटनेद्वारा अपरिवर्तनीय स्वरुपात समाजवाद स्वीकारून त्यासमवेत संसदीय लोकशाही आणावी हा डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा आग्रह अत्यंत उचित होता, कारण तो भारतीय वैशिष्ठ्याची दखल घेणारा आग्रह होता; पण त्यांचे कुणी मानले नाही. जर समाजवादी लोकशाही स्वीकारली तर स्वातंत्र्यामागोमाग ओढवलेल्या संकटात प्रतिगाम्यांच्या विरोधाची भर पडून अराजक माजेल असे पंडित नेहरूनाही वाटत होते.

पण आज नेमकी उलट परिस्थिती आहे. एक टक्का वर्ग ९९ टक्के लोकाना लुटून हुकूमशाही गाजवित आहे. सरकारी आकडेवारीच सांगत आहे की या देशात साठ कोटी लोक दारिद्र्य रेषेखाली आहेत. म्हणजे दोन वेळचे पुरेसे जेवण नि पुरेसा कपडा त्यांना मिळत नाही. २५ कोटी २० लाख लोकाना तर दोन वेळचे जेवणही नसते. सहा कोटी युवक बेकार आहेत. महागाई किती वाढली ? तर १९४७ साली १२ पैशात जे मिळायचे ते आता एका रुपयात मिळते आणि बारा पैशात काहीच मिळत नाही ! अशा या महागाईच्या चरकातून कोट्यावधी जनतेला पिळून या देशातील प्रगतीसाठी भांडवल उभे करण्यात आले. भांडवलदारावर कसाही कर लादला तरी ते कराचा पैसा किंमती वाढवून लोकांकडूनच वसूल करतात, तेव्हा करही अखेर गरिबच देतात. अशा प्रकारे ९९ टक्के लोकांना लुटले जात आहे व दहशतीखाली दडपले जात आहे. एक प्रकारचे अराजकच हवेत पसरले आहे. प्रथम समाजवाद व त्यासमवेत लोकशाही प्रस्थापित केली नाही आणि ९९ टक्के लोकांना दिलासा दिला नाही तर केव्हा काय घडेल त्याचा नेम नाही. म्हणून आजची गरज निश्चित उद्दीष्टासाठी, सुस्पष्ट किमान क्रांतिकारक कार्यक्रमावर एकजूट बांधण्याची आहे.

## क्रांतिकारक कार्यक्रमावरच लाट निर्माण होईल ?

**प्रश्न :–** भारतात आज नेमके काय केले पाहिजे ?

**नीलकंठ खाडीलकर :–** (१) सर्वप्रथम एक टक्का वर्ग विरुद्ध ९९ टक्के जनता असे संघर्षाचे स्वरुप स्पष्टपणे समाजापुढे ठेवले पाहिजे.

(२) अत्यंत सुस्पष्ट असा ९९ टक्के लोकांच्या फायद्याचा किमान क्रांतिकारक कार्यक्रम लोकांसमोर मांडला पाहिजे. त्या कार्यक्रमावर एकजूट बांधली पाहिजे आणि कार्यक्रम अमलात आणण्यासाठीच सत्ता हवी असे उद्दिष्ट स्पष्टपणे ठेवले पाहिजे

(३) यामुळे सत्ताधारी पक्षाला खणखणीत असा पर्याय निर्माण होईल. आज लोकांना केवळ सत्ताधाऱ्यात बदल नको असून स्वतःच्या भाग्यात बदल हवा आहे. क्रांतिकारक कार्यक्रमाचा पर्याय लोकांना हवा आहे. भारतातील निवडणुकीत कोणत्या तरी एकाच बाजूने लाट येत असते. याचा अर्थ बदल घडविण्यास लोक आतुर आहेत आणि जो बदल घडविल असे वाटते त्याला सत्तेचे दान लोक उदारहस्ते करतात. बँकांच्या राष्ट्रीकरणानंतर याच अपेक्षेने इंदिराजींची लाट आली आणि खलिस्तान्यांच्या खुनी राजकारणानंतरही अशाच अपेक्षेने राजीव गांधींची लाट निर्माण झाली. १९७७ सालची जनता पक्षाची लाटही बदल घविण्यासाठीच आली होती. अशीच लाट प्रॅक्टिकल सोशॅलिझमच्या क्रांतिकारक बदलाची हमी देणाऱ्या पर्यायाची निश्चितपणे येईल.

(४) आजचे वृद्ध विरोधी पक्षनेते म्हणजे पंक्चर झालेले टायर आहेत. सत्ताधारी प्रमुखाचा द्वेष आणि त्यांच्याविरुद्ध विचारशून्य व बदलशून्य अशी सर्वांची भोंगळ आणि भोंदू आघाडी हा प्रयोग जनतेला अमान्य झाला आहे आणि 'आपल्या नशिबात काय फरक होणार ?' असे पुटपुटतच मतदार मतदान करतात. हीच वेळ आहे निश्चित विचारसरणीचा आणि क्रांतिकारक कार्यक्रमाचा आवाज उठविण्याची आणि त्यालाच हिरो बनविण्याची !

(५) प्रॅक्टीकल सोशॅलिझमच्या कार्यक्रमात लोकांना भयभीत करणारा अतिरेक नाही, एकाच वर्गाला क्रांतीचा दूत मानण्याची पोथीनिष्ठा नाही आणि कसल्याही बदलाची अशाच नाहीसा करणारा भिन्न विचाराच्या मंडळींनी केवळ मतांच्या बेरजेसाठी केलेल्या आघाडीचा भोंगळपणा नाही.

(६) ही लढाई एक टक्का विरुद्ध ९९ टक्के अशी असल्याने लोकशाही मार्गाने विजयी होणारच आणि तसा विश्वास सर्वांना वाटणारच.

(७) बावनकशी राष्ट्रनिष्ठा, प्रत्येकाला जन्मतःच अन्न–वस्त्र–निवारा–शिक्षण–नोकरी–औषध उपचार यांची हमी देणारा क्रांतिकारक सुस्पष्ट कार्यक्रम, समाजवादाची प्रस्थापना करून त्यासमवेत लोकशाही ही प्रॅक्टिकल सोशॅलिझमची त्रिसूत्री आहे. स्वतः आणि स्वतःचे कुटुंबिय यांच्यामार्फत चालविण्यात येणारा छोटा उद्योगधंदा किंवा शेती किंवा दुकानदारी यांना अभय राहीलच; पण सरकारी अधिकारी त्यांच्यापर्यंत जाऊन त्यांना जास्तीत जास्त सहकार्य देतील. फक्त मक्तेदारी भांडवलशाही संपविली जाईल. तसेच एका व्यक्तीला एकाच कंपनीचे संचालक होण्याची मुभा राहील. सध्या एकच बडा भांडवलदार पन्नास कंपन्यांचा संचालक बनतो. प्रत्येक कंपनी ही दुभती गाय असून जास्तीत जास्त पिळून तिचे दूध पळवायचे या एकमेव धोरणाने तो कारभार करतो. कोणतीही कंपनी बंद पडली तरी त्याचे काहीच कधी बिघडत नाही. जर एकच कंपनी त्याच्याकडे असेल तर मक्तेदार साम्राज्याला तडा जाईल; पण त्या कंपनीत त्याला लक्ष घालावे लागेल व लक्ष देताही येईल.

**प्रश्न :–** प्रॅक्टिकल सोशॅलिझमचा सविस्तर कार्यक्रम कोणता ?

**नीलकंठ खाडिलकर :–** हा सविस्तर कार्यक्रम प्रॅक्टिकल सोशॅलिझमच्या पुस्तकात दिला असून, पा. वा. गाडगिळांसारख्या विचारवंतांनी त्याची 'अपूर्व' या विशेषणाने प्रशंसा केली आहे. सारांशरुपाने हा कार्यक्रम प्रॅक्टीकल सोशॅलिझमच्या दुसऱ्या भागात दिला

असून सदर पुस्तक आणखी दोन महिन्यात प्रसिद्ध होईल. त्यातच डॉ. आंबेडकराना नेमके काय हवे होते ? आणि गौतम बुद्धाने आम्हाला काय शिकविले ? या दोन लेखमालाही आहेत. त्यावरून ही विचारधारा अस्सल भारतीय कशी आहे ते स्फटीकासारखे स्वच्छपणे दिसून येईल, भाई संगारे–सुरेश नगर्सेकर यानी ' प्रॅक्टिकल सोशॅलिझम फ्रण्टची भूमिका ' या नावाची पुस्तिका लिहिली असून त्यातही हा कार्यक्रम आहेच. जागेच्या अभावी सविस्तर कार्यक्रम येथे मांडता येत नाही आणि नाईलाजास्तव ही तीन पुस्तकेच वाचण्याची मी नम्रपणे प्रार्थना करतो. □

---

# युवक व सामाजिक कार्यकर्ते यांना आवाहन

महाराष्ट्रात अनेक स्वयंसेवी संस्था-संघटना-युवकाचे गट विविध ठिकाणी सामाजिक परिवर्तनाच्या उद्देशाने कार्य करत आहेत. गेल्या दहा वर्षांमध्ये त्याच्यामार्फत ठिकठिकाणी स्थानिक पातळीवर सामाजिक–आर्थिक प्रश्नांवर चळवळी उभ्या राहिल्या. काही प्रश्नांची सोडवणूक झाल्यासारखी वाटली. मात्र त्यातून टिकाऊ, सुसंघटित ताकद निर्माण करण्यात परिवर्तनवादी चळवळीला अपेक्षित यश मिळालेले दिसत नाही.

त्याचप्रमाणे या चळवळीच्या परिघाबाहेरही अनेक तरुण–तरुणींच्या मनात समाजाच्या सध्याच्या स्थितीविषयी असंतोष आहे. मात्र प्रत्यक्ष कार्य व प्रशिक्षण यांचा अभाव, तसेच परिस्थितीची दडपणे यामुळे ही स्थिती बदलण्यासाठी स्वतः काही करण्याच्या त्यांच्या ऊर्मी, जाणिवाच्या प्राथमिक अवस्थेतच विरून जातात.

अशा तरुणांची व कार्यकर्त्यांची गरज लक्षात घेऊन 'नवनिर्माण न्यास' या संस्थेने सामाजिक कार्यकर्त्यांच्या प्रशिक्षणाचे एक केंद्र सुरू करण्याचे योजले आहे. 'नवनिर्माण न्यास ' ही एक सार्वजनिक विश्वस्त सस्था असून रचनात्मक कार्यक्रमातून समाजविकासाला, विशेषतः ग्रामीण विकासाला चालना देण्याचे तिचे उद्दिष्ट आहे. याचाच एक भाग म्हणून कार्यकर्त्यांचा सदर प्रशिक्षण कार्यक्रम जून १९८५ पासून मौजे पारगाव सालुमालु, ता. दौंड, जि. पुणे येथे सुरू करण्यात येत आहे.

### या प्रशिक्षण कार्यक्रमाचे स्वरूप

१. या प्रशिक्षणकार्यक्रमाचा कालावधी दोन वर्षांचा असेल.

२. या कार्यक्रमात २० ते ३० वर्षे वयोगटातील (स्त्री अथवा पुरुष) युवक। कार्यकर्त्यांना सहभागी होता येईल.

३. या अभ्यासक्रमाबद्दल कोणतीही पदवी किंवा प्रशस्तिपत्रक दिले जाणार नाही.

४. महाविद्यालयीन शिक्षण घेतलेल्या किंवा कोणत्याही सामाजिक सस्थामध्ये कामाचा अनुभव असलेल्याना व समाजकार्यात रस असणाऱ्यांना प्रवेशात प्राधान्य मिळेल. सामाजिक सस्थांमधून आलेल्या कार्यकर्त्यांना या कार्यक्रमात वैयक्तिक पातळीवर सहभागी होता येईल.

५. या कार्यक्रमात सहभागी झालेल्या कार्यकर्त्यांची भोजन–निवासाची सोय केली जाईल. त्यांना प्रत्येकी दरमहा रु. ३००– विद्यावेतन दिले जाईल व त्यातून भोजन–निवास–खर्च कमी केला जाईल.

### या प्रशिक्षण कार्यक्रमाची वैशिष्टचे

शेती, पशुपालन व आरोग्य या विषयांद्वारा ग्रामीण जीवनाच्या प्रत्यक्ष अनुभवातून प्रशिक्षणाची सधी मिळेल.

० रचनात्मक कार्यक्रम, तसेच गाणी, पथनाटय इ. विविध माध्यमाचा वापर करून, लोकांच्या सहभागातून त्याचे प्रश्न सोडविण्याच्या पद्धतीचे, या कार्यकर्त्यांच्या सहभागातून विकसित होणाऱ्या तंत्राचे शिक्षण मिळेल.

० आपल्या अनुभवांचा अर्थ व्यापक समाजकारण – राजकारणाशी जोडण्यासाठी आवश्यक ते ज्ञान पुस्तकांमार्फत, तसेच नामवंत विचारवंत–प्राध्यापकांच्या मार्गदर्शनाने कमावण्याची संधी मिळेल.

० या प्रशिक्षण कार्यक्रमात कार्यकर्त्यांसाठी दररोज काही काळ प्रत्यक्ष शारीरिक श्रमाचा समावेश असेल.

### प्रवेश मिळविण्यासाठी

या कार्यक्रमात पहिल्या वर्षी दहा कार्यकर्ते घेतले जातील. दोन वर्षांच्या कार्यक्रमात सहभागी होऊ इच्छिणाऱ्या सर्व कार्यकर्त्यांची प्रथम दहा ते पंधरा दिवसाची कार्यशाळा चालवली जाईल. त्यात सहभागी झालेल्याच्यामधून प्रशिक्षणार्थींची निवड केली जाईल. कार्यकर्त्यांनाही या कार्यशाळेच्या दिनक्रमातून पुढील अभ्यासक्रमाची कल्पना येऊ शकेल. या कार्यशाळेत सहभागी होण्यासाठी करावयाचे अर्ज व या कार्यक्रमाची अधिक माहिती खालील पत्त्यावर उपलब्ध होईल. आपले अर्ज भरून दि. १५ मे ८५ पर्यंत पोचतील अशा बेताने याच पत्त्यावर पाठवावेत.

सपर्क :

नवनिर्माण न्यास
द्वारा वसुधा सरदार
१२४३।२ आपटे रोड, पुणे ४११००४.
आबा करमरकर
कार्यकारी विश्वस्त,
नवनिर्माण न्यास

